

नमःशिवाय

संत शिरोमणी श्री मन्मथ स्वामी

यांचा

# मन्मथ गाथा



: प्रती :
१०००

: श्रावण शुद्ध ५ :
शके १८८७

0155,1J60x
K5

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

0155,1(J60x
K5
3522



# नमःशिवाय







# हर हर महादेव

ॐ नमः शिवाय

ॐ नमः शिवाय

## संत शिरोमणी श्री मन्मथस्वामी महाराज की जय

कलियुगांत जप तपाचीं साधनें असाध्य असलीं तरी त्यांतून शिव नामस्मरणानें मानवाला होणारा आनंद अवर्णनीय तसेंच अनुपमेय आहे. सदर गाथ्यांतील प्रसादवाणीचे (शिवपाठासह) ६०० अभंग श्रवण पठण केल्यानें आपणांस षट्स्थलसागर पैलतीर सापडतो.

### – ग्रंथ मिळण्याचीं ठिकाणें –

काडादी वीरशैव धर्मादाय निधी ट्रस्ट
प. मंगळवार पेठ, सोलापूर, २.
( महाराष्ट्र )

ॐ नमः शिवायचे प्रकाशक
गुरुशांत शिवराचय्या स्वामी
कोळ्ळे मास्तर लातूर,
जि. उस्मानाबाद. (महाराष्ट्र)

आवृत्ती चौथी, प्रती १०००
शके १८८७ विश्वावसुनाम सवंत्सरे
मिती श्रावण शुद्ध ५ सोमवार तारीख २ ऑगष्ट इ. सन १९६५

किंमत २ रुपये. : पोस्ट खर्च वेगळा.

ॐ नमः शिवाय

ॐ नमः शिवाय

ॐ नमः शिवाय

SRI JAGADGURU VISHWARADHYA
JNANA SIMHASAN JNANAMANDIR
LIBRARY,
Jangamwadi Math, VARANASI,
Acc No. ....3522.....
CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ॐ नमः शिवाय

# श्री शिवयोगी मन्मथ स्वामी महाराज

## श्री क्षेत्र कपिलाधार, जिल्हा बीड.



# श्री मन्मथ स्वामी गाथा

ॐ नमः शिवाय

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

श्री गुरु संगमेश्वर प्रसन्न

# निवेदन

शिवयोगी श्री मन्मथ स्वामी महाराज यांचा जन्म माघ शुद्ध पंचमी रोज सोमवारी शके १४८२ (सन १५६०) मध्यें महाराष्ट्रांत बीड जिल्ह्यांतील नेकनूर गांवीं शिवभक्त परायण श्री. पार्वतीदेवीं व श्री. शिवलिंगस्वामी (माहेश्वर) यांच्या उदरी झाला. यानीं आपला अभ्यास तत्कालीन माणूर मठाध्यक्ष श्री. बसवलिंग स्वामी यांचेकडे राहून धार्मिक, संस्कृत, कानडी व मराठी भाषेंचा केला. वयांत आलेवर सर्व पवित्र स्थानें पाहून नंतर अनेकांना शिष्य बनवून शिवदीक्षा दिली. श्री. मन्मथ स्वामीनीं गुरुलिंग जंगमाचे, पूजेचें महत्त्व व अष्टावर्णाची महती पटवून देऊन शिव सांप्रदायी भजनाची अभिरुची जनतेंत उत्पन्न केली. या त्यांच्या काव्यास मन्मथ स्वामी गाथा म्हणतात. यामुळें वीरशैव तत्त्वज्ञानाची ध्वजा पुनरपि फडकाविली व परमतीयांची उसळती लाट थोपवून धरली. म्हणून यांना 'सब संतनके नाथ' असें सर्वजण म्हणत. पुढें त्यांनीं एकांतवासासाठीं कपीलधार येथें वास करून लिंगानंदमध्यें मग्न होवून तेथेंच शके १५३५ मध्यें योग समाधी घेतली. महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं यांच्या नांवचें मठ अगर देवळें आहेत. अद्यापि दरसाल मिती कार्तिक शु॥ १५ ते व॥ ५ पर्यंत कपीलधार येथें मोठी यात्रा भरत असते. हजारो भक्तगण पूजा, अर्चा, गणाराधना करून दर्शन घेतात.

श्री. मन्मथ स्वामीकृत 'परम रहस्य' हा ग्रंथ सर्वश्रृत आहेच. दुसरा ग्रंथ जो आतां छापून प्रसिद्ध होत आहे तो हा. यांत श्री. मन्मथ स्वामी व त्यांचे शिष्य शिवलिंग हे माहेश्वर व शिवलिंग यांचे शिष्य लिंगेश्वर यांचे पुत्र बसवलिंग यांचे पुत्र लक्ष्मण हे भक्तवर्गापैकीं होत. शिवदास व लक्ष्मण हे समकालीन असून महादेवबद्दल माहिती मिळत नाहीं. यापूर्वी सदर अभंगाचें मुद्रण चाळीस, साठ व ऐंशी वर्षामागें (असे त्रिवार) झालेले आहेत. ते आतां मिळत नसल्यानें, ॐ नमःशिवायचे प्रकाशक गुरुशांत शिवराचय्या स्वामी, कोळ्ळे मास्तर, लातूर यांचें सांगणेवरून पूर्वीप्रमाणेंच छापून प्रसिद्ध केले आहे. सदर ग्रंथ छापतांना तपासणीचें काम येथील श्री. बसप्पा वीरभद्रप्पा वारद यांनीं भक्तीभावानें केलें आहे. प्रस्तुत ग्रंथ वीरशैव व इतर शिवभक्त सांप्रदायिक लोकांनीं संग्रही ठेवून, मनन करून पुनीत व्हावें.

**श्री मन्मथस्वामी यांचें चरणीं अर्पण.**

श्रावण शु॥ ५ सोमवार, शके १८८७
दिनांक २-८-१९६५.

**काडादी वीरशैव धर्मादाय निधी,**
**ट्रस्ट, सोलापूर.**

प्रती १००० ) —सदर पुस्तके मिळण्याचे ठिकाण— ( मूल्य २ रु.

काडादी वीरशैव धर्मादाय निधी, प. मंगळवार पेठ, सोलापूर. तसेच
ॐ नमःशिवायचे प्रकाशक, श्री गुरुशांतस्वामी कोळ्ळे मास्तर, लातूर, यांचेकडे मिळतील.

मुद्रकः— श्री. रमण गांधी, कल्पकला प्रेस, सोलापूर.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

 नमःशिवाय

वन्दे शंभुमुमापतिम् सुरगुरुम् वन्दे जगत्कारणम्
वन्दे पन्नगभूषणम् मृगधरम् वन्दे पशूनांपतिम्
वन्दे सूर्यशशांक-वन्हिनयनम् वन्दे मुकुंदप्रियम्
वन्दे भक्तजनाश्रयम्च वरदम् वन्दे शिवंशंकरम्

वन्दे सृष्टिनियामकम् सुरवरम् वन्दे जगत्पालकम्
वन्दे सृष्टिविधायकम् परतरम् वन्दे रमेशप्रभुम्
वन्दे वन्हिदिनेश चंद्रनयनम् वन्दे चिदामोदितम्
वन्दे रत्नविभूषणम् सुखकरम् वन्दे जटाधारकम्

वन्दे व्यासमुनींद्र दिव्यपददम् वन्दे जगत्स्थापकम्
वन्दे ब्रम्हकपाल-रुंडदद्दितम् वन्दे गणानांपतिम्
वन्दे दुष्टनृसिंहगर्वहरणम् वन्दे सुधासागरम्
वन्दे भक्त महेश मुक्तिवरदम् वन्दे सुरैर्वंदितम्

वन्दे सत्यसुपालकम् वरकरम् वन्दे जगद्व्यापकम्
वन्दे मिथ्यविनाशकम् भयहरम् वन्दे कृपाकारकम्
वन्दे वेंकटपूजितम् भवधरम् वन्दे त्रिलोकप्रियम्
वन्दे सत्वपरीक्षकम् शशिधरम् वन्दे मुक्तिकारकम्

वन्दे सौख्यविवर्धनम् सुमंगलम् वन्दे जगत्पूजितम्
वन्दे दुःखविनाशनम् त्रिनयनम् वन्दे निजानंददम्
वन्दे नागसुभूषणम् सुप्रकाशम् वन्दे उमावल्लभम्
वन्दे इच्छिततृप्तकम् शुभकरम् वन्दे शिवंशंकरम्

 नमःशिवाय

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## ॥ ॐ नमःशिवाय ॥



## ★ श्री शंकर प्रसन्न ★

# श्री मन्मथस्वामीचे अभंग प्रारंभ.

॥ प्रमथ गणाचिये मेळीं ॥ चंद्र मौळी देखियेला ॥ १ ॥ भस्म शोभें सर्वांगीं ॥ वामभागीं भवानी ॥२॥ शोभें पन्नग भूषण ॥ नंदी वाहन साजिरे ॥ ३ ॥ संगें तापसांचे भार ॥ रमावर विरंची ॥ ४ ॥ छत्रचामर उभविती ॥ गीतीं गाती बडिवार ॥ ५ ॥ ऐसा पाहुनिया डोळां ॥ सुख सोहळा सुखाचा ॥ ६ ॥ मन्मथ घाली लोटांगण ॥ कवळी चरण आवडी ॥ ७ ॥

### अभंग २ रा.

॥ जटाजूटीं गंगा व्याघ्र-चर्मधारी ॥ त्याची सेवा बरी वाटे जीवा ॥ १ ॥ वामांगीं पार्वती अंगाशीं विभूती ॥ तेथें माझी मति बैसलीसे ॥ २ ॥ तया वीण दुजें नये माझें मना ॥ चात-काशीं जाणा मेघ जैसा ॥३॥ मत्स्यालागीं जैसें जळीं जीवपण ॥ तयातें सांडून वांचे केवीं ॥ ४ ॥ तैसें आम्हां आहे सांडीता

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ही सोय ॥ बहु बोलूं काय वाचें आतां ॥ ५ ॥ जन्मताचें पूर्वीं शिवार्पण पिंड ॥ वृत्ति ही अखंड झाली असे ॥ ६ ॥ मन्मथ शिवलिंग म्हणे ऐसा नेम ॥ अंतरीचा प्रेम सदाशिव ॥ ७ ॥

अभंग ३ रा.

॥ सनकादिकांचें जें गुज ॥ हरि ब्रम्हा याचे निज ॥ १ ॥ योगीजन ज्यातें ध्याती ॥ तो हा पार्वतीचा पती ॥ २ ॥ भाळीं भस्म चंद्रकळा ॥ गळां शोभे रुंडमाळा ॥ ३ ॥ माझें आराध्य दैवत ॥ तेथें विसावलें चित्त ॥ ४ ॥ गौरवपूशुभ्रकांती ॥ अंगीं चर्चिली विभूती ॥५॥ हर काया वाचा मन ॥ मन्मथ आधीचा शरण ॥ ६ ॥

अभंग ४ था.

॥ कोणी एक चोर करावया चोरी॥ ग्रामाचे भीतरीं प्रवेशला ॥१॥ तया राजदूतें मारूनीया जीवें॥ टाकियलें शव पापीयाचें ॥२॥ राखेंत बैसलें होतें एक श्वान ॥ देखिलें दुरून प्रेत त्यानें ॥ ३ ॥ आमिषाचे लोभें समीप येऊन ॥ ठेविला चरण भाळीं त्याच्या ॥ ४ ॥ राखेचा त्रिपुंड्र मस्तकीं लाधला ॥ शिवलोकीं झाला जयजयकार ॥ ५ ॥ उदेलें संचित जळालें पातक ॥ कैलास नायक संतोषला ॥ ६ ॥ केली गणां आज्ञा सन्मानें आणिला ॥ नीजपदीं दिधला ठाव त्यासीं ॥ ७ ॥ मन्मथ शिवलिंग म्हणे कृपावंत ॥ होऊनी पतीत जनां तारी ॥ ८ ॥

अभंग ५ वा.

॥ शिवतोची देव येरते सेवक ॥ विष्णु ब्रम्हादिक सुरासूर ॥ १ ॥ महादेव ऐसें जया असें नांव ॥ येथें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अभिप्राय तोचि असे ॥ २ ॥ वेदशास्त्रें आणि पुराणें बोलती ॥ सर्वांसी पशुपती वंद्य जाणा ॥ ३ ॥ ऐसा सनकादिकीं केलासे निश्चय ॥ सर्वांसी तो ध्येय उमाकांत ॥४॥ मन्मथ म्हणे शिव सगुण निर्गुण ॥ असे परिपूर्ण अविनाश॥५॥

अभंग ६ वा.

सुखी केलें मज पार्वती रमण ॥ आपुलें भजन देवोनिया ॥ १ ॥ देवोनिया मज सुखी केलें ऐसें ॥ पुन्हा मृत्यु फांसे न लागती ॥ २ ॥ यमाचा दरारा चुकविला माझा ॥ सांगूंकाय चोजा नामाच्याहो ॥ ३ ॥ नामघेतां वाचें तारीलें कित्येका ॥ गौळीपोर देखा गणिका भिल्ल ॥ ४ ॥ मन्मथ म्हणे काय वर्णूं त्याची थोरी ॥ मोक्ष घरोघरीं भक्ताचीया ॥ ५ ॥

अभंग ७ वा

॥ सार सकळ तीर्थांचें ॥ वंद्य पाऊल गुरूचें ॥ १ ॥ नलगे काशीलागीं जावें ॥ रूप हृदयीं धरावें ॥ २ ॥ तेणें सुख होय जीवा ॥ न पडे संसारासी गोवा ॥ ३ ॥ पद जलपान करितां ॥ मोक्ष चढतसे हातां ॥ ४ ॥ न लगे योग मुद्रा ध्यान ॥ ध्यातां गुरूचें चरण ॥ ५ ॥ म्हणे मन्मथ शिवलिंग ॥ गुरुरूप होय अंग ॥ ६ ॥

अभंग ८ वा.

॥ पिंडीवरी ठेवितां पाय ॥ ठाय त्यासी अर्पिला ॥ १ ॥ भिल्ला मुखींच्या गरळा ॥ बेल पाल्या मिश्रित ॥ २ ॥ त्यासी डोलविला माथां ॥ केला सरिता कैलासी ॥ ३ ॥ काय नेणो त्याची गोडी ॥ कोण आवडी प्रेमाची ॥ ४ ॥ चांडाळीची बिल्व

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पूजा ॥ महाराजा तुज चांग ॥ ५ ॥ मन्मथ म्हणे देव भोळा ॥ त्याची लीला अगम्य ॥ ६ ॥

अभंग ९ वा.

॥ वाणूं नये गुणदोष ॥ जंगम वेष पाहिल्या ॥ १ ॥ शंकर ऐसा भावोनी मनीं ॥ श्रेष्ठासनीं बैसवावा ॥ २ ॥ भावें करावें पूजन ॥ यथाशक्तीं द्यावें अन्न ॥ ३ ॥ पुसूं नये यातीकूळ ॥ त्याचें मूळ शोधूं नये ॥४॥ मन्मथ म्हणे ऐसे यात॥ साधन बहूत साटोपें ॥ ५ ॥

अभंग १० वा.

॥ अवघ्या शकुनाचा शकुन ॥ झालें दर्शन संताचें ॥ १ ॥ पाप ताप दैन्य नासें ॥ सुखा फुटें हो दोंदले ॥ २ ॥ होय जन्माचें सार्थक ॥ एकाएकीं समसाम्य ॥ ३ मन्मथ म्हणे फळा आलें ॥ मागील केलें सुकृत ॥ ४ ॥

अभंग ११ वा.

॥ देव शरणांगता तारी ॥ पाप पुण्य न विचारी ॥ १ ॥ तोडी संसार बंधन ॥ लावी चरणीं अंतःकरण ॥ २ ॥ दावी भजनाची ठेव ॥ नामीं गोवीं चित्तभाव ॥ ३ ॥ दासा जाऊं नेंदी वाया ॥ पूर्णानंद करी छाया ॥ ४ ॥ मन्मथ म्हणे महादेव ॥ राखी आपुलें वैभव ॥ ५ ॥

अभंग १२ वा.

॥ पार्वतीशी म्हणे शिव भक्ताचें घरीं ॥ रहावयाची थोरी वाटें मज ॥ १ ॥ नावडें कैलास नको मंद्रागिरी ॥ आवी मुक्ति पुरी तीही नको ॥ २ ॥ नावडें श्री शैल्य नागापृष्टी वास ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

हिमालयीं त्रास आला मज ॥ ३ ॥ मुखीं नाम गाती सद्भावें अर्चीती ॥ कीर्तनीं नाचती आनंदानें ॥४॥ तेथींचें हें सुख न बोलवें वाचें ॥ मीही तैसा नाचें प्रेम भरें ॥५॥ तयाचा संसार करी निज आंगें ॥ चित्त प्रेमभंगें होऊं नेदी ॥ ६ ॥ मन्मथ शिवलिंग म्हणे नेमोत्तर ॥ स्वमुखें शंकर बोलिलासे ॥७॥

## अभंग १३ वा.

पुण्यवंत तोची देश ॥ केला वास शिवभक्तें ॥ नसे पातकासी थारा ॥ वारा न यमदूताचा ॥२॥ उमेसह रक्षण करी ॥ राहात द्वारीं भक्तांच्या ॥३॥ म्हणे मन्मथशिवलिंग ॥ येणें जग हें पावन ॥४॥

## अभंग १४ वा.

भाळीं भस्मलिंग गळां ॥ शोभे रुद्राक्षांच्या माळा ॥ १ ॥ मुखीं मंत्र पंचाक्षर ॥ धन्य धन्य तें शरीर ॥२॥ तीर्थ व्रतासी आधार महादोषांचा संहार ॥३॥ त्याचें झालिया दर्शन ॥ पापी उद्धरती जन ४॥ मन्मथ म्हणे हें खरें ॥ भू ईश्वर अवतरे ॥५॥

## अभंग १५ वा

तेची पुण्यवंत नर ॥ जे का पूजिती शंकर ॥१॥ शिवस्मरणीं चित्त ज्यांचें ॥ पाप दग्ध झालें त्यांचें ॥२॥ सदाशिव नाम मुखीं ॥ कोण तयाविण सुखी ॥ ३ ॥ शिवपूजा विलोकनीं ॥ ज्याची न हाले पापणी ॥४॥ शिवकथा श्रोतीं प्रीती ॥ शिव ध्यानीं जडे वृत्ती ॥५॥ म्हणे मन्मथ शिवलिंग ॥ घडो ऐसियाचा संग ॥६॥

## अभंग १६ वा.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शंकरा शरण गेलियावांचून ॥ नोव्हेची कल्याण कर्म केल्या ॥१॥ आचरतां धर्म अधर्म तो होय ॥ मृत्यंजय पाय स्मरल्या-वीण ॥२॥ तीर्थ व्रतदान अष्टांगादि योग ॥ आचरतां भोग न चुकेची ॥३॥ नाना दैवताचें केलिया पूजन ॥ अनन्यता तेणें नष्ट होय ॥४॥ मन्मथ म्हणे जन वर्म ते चुकती ॥ चौऱ्यांशीचे गुंतीं पडे तेणें ॥५॥

अभंग १७ वा.

माझें जीवीचें जीवन ॥ देव पार्वती रमण ॥१॥ चित्त जडलें त्याचे पायीं ॥ आतां दुजें नेणों कांहीं ॥२॥ अवघा आनंदाचा काळ ॥ पोटीं भरला जाश्वनीळ ॥३॥ प्रेम शरीरीं दाटलें ॥ सर्व दुःख दुरावलें ॥ ४ ॥ सुखा नाहीं अंतपार ॥ अर्थ लाधला अपार ॥५॥ म्हणे मन्मथ शिवलिंग ॥ सुखी केलें उमारंग ॥६॥

अभंग १८ वा.

आधीं आम्हीं द्वाड मातेपोटीं जन्म ॥ बहुताचें काम बुडवीलें ॥ घेऊनी पडलों बहु अर्थ जनां ॥ साधकाच्या मनां भेद केला ॥२॥ जागे केले मुनी समाधीपासूनी ॥ सांख्य ब्रह्मज्ञानी चेव-वीले ॥३॥ यज्ञाचीया वाटा टाकिल्या मोडूनी ॥ तीर्थालागीं जाणें खुंटाविले ॥ ४ ॥ मन्मथ शिवलिंग म्हणे एकवेळा ॥ भक्तीचा सोहळा घरोघरीं ॥५॥

अभंग १९ वा.

उठोनिया प्रातःकाळीं ॥ नाम घ्यावें हो शिवाचें ॥१॥ तेणें अविद्येचें ज्ञान ॥ अवघें नासे जिवाचें ॥२॥ नेमें त्रिकाळ जपतां ॥ मोक्षपद येतें हातां॥३॥ भावें सर्वदा जपतां ॥ तद्रुपच तूं होशी

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥४॥ जयाचिया निजध्यासें ॥ अळी होतसे भ्रमरी ॥५॥ मन्मथ शिवलिंग म्हणे ॥ तैसे परी हें होय ॥६॥

## अभंग २० वा.

घरी इच्छा सत्संगाची ॥ बहु आवडी गुणांची ॥१॥ सेवन असे सद्विद्येचें ॥ दास्य करी सद्गुरूचें ॥ २ ॥ लोकनिंद्य कर्म टाळी ॥ स्वस्त्री भोगी ऋतुकाळीं ॥३॥ सदाशिवीं दृढभाव ॥ इंद्रिय जावो नेदी वाव ॥४॥ न धरीं संग दुर्जनाचा ॥ शंकर नामीं दृढ वाचा ॥५॥ मन्मथ म्हणे ऐसा नर ॥ तया माझा नमस्कार ॥६॥

## अभंग २१ वा.

शंकर तोची निर्विकार ॥ ब्रह्म मायेचे पसार ॥१॥ अवघा तोची परात्पर ॥ शंकरची शंकरची ॥ २ ॥ शंकर जळीं काष्टीं भरला ॥ पिंडीं ब्रह्मांडीं बिंबला ॥३॥ अलक्ष दृष्टीनें लक्षिला ॥ शंकरची शंकरची ॥४॥ शंकर नामीं मन रंगलें ॥ आंगीं प्रेम हो दाटलें ॥५॥ भक्तां संकटीं रक्षिलें ॥ शंकरची शंकरची ॥६॥ शंकर पायीं जडलें मन ॥ हरपलें मी तूं पण ॥ ७ ॥ ब्रह्म मायेतें उत्पन्न ॥ शंकरची शंकरची ॥८॥ उभा जान्हवीचें तटीं ॥ वाट पाहे भक्तांसाठीं ॥९॥ मन्मथ शिवलिंगाचें भेटीं ॥ शंकरची शंकरची ॥ १० ॥

## अभंग २२ वा.

आपो नारायण श्रुतीचें प्रमाण ॥ जेथींची ही खूण पाहा तेथें ॥१॥ घटामाजीं येतां होय विभिन्नता ॥ तेथें स्वधर्मता न चुकेची ॥२॥ उपासनाद्वारा आराधना भिन्न ॥ तेथेंही समान

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पाहूं नये ॥ ३ ॥ हरी हर ऐसा नामीं आहे भेद ॥ तेथें अभेद म्हणती मूर्ख ॥४॥ अर्चन आव्हान सगुणाचें ध्यान ॥ भक्तीचें लक्षण हेंची असें ॥५॥ स्वधर्मी जे इष्ट करितांना स्पष्ट॥ तेथेंही अनिष्ट नोव्हे कदां ॥६॥ मन्मथ शिवलिंग म्हणे हा विस्तार ॥ वेदांतीचें सार निवडीलें ॥७॥

अभंग २३ वा

शिवभक्तीविन्मुख तो नर पातकी॥ ऐसा सनकादिकी केला ॥ नेम ॥१॥ हो का पुण्यश्लोक अग्रकुळीं जन्म ॥ अंतरीं निष्काम असेनाका ॥ २ ॥ वेदाचा गौरव शास्त्राचा अनुभव ॥ पुराण सावयव जाणेनाका ॥३॥ हो का तपोनिष्ठ सदा तीर्थवासी ॥ गया आणि काशी सेवीनाका ॥४॥ यज्ञादिक कर्म करूनिया सांग ॥ पावला अव्यंग स्वर्ग सुख ॥५॥ मन्मथ शिवलिंग म्हणे भक्तीवीण ॥ जाणावा तो शीण रितें माप ॥६॥

अभंग २४ वा

सांडोनी शिवातें दुजियातें ध्याती ॥ त्याचें तोंडीं माती जन्मोजन्मीं ॥ १ ॥ जन्म तो तयाचा उत्तमहो कैचा ॥ श्वान सूकरांचा निंद्य देह ॥ २ ॥ निंदा शंकराची ज्या मुखें घडली ॥ तयाप्रती भली विष्ठा, मूत्र॥३॥ मूत्रामाजीं स्नान विष्टेंत शयन॥ भक्षूनीया राहणें लोक द्वारीं ॥४॥ द्वाराचिया आंत पाऊल घालीतां ॥ मारिताती माथां शिळाघायें ॥५॥ ऐसी दुःखें ज्यातें होती असंख्यात ॥ शेखी निरया जात तया दोषें ॥६॥ मन्मथ शिवलिंग म्हणे शिवभक्त॥ निंदकाची वार्ता न ऐकावी ॥७॥

अभंग २५ वा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

लिंगांगासी लग्न गुरुनाथें लाविलें ॥ तेथें ध्यातां भले एकनिष्ठ ॥ १ ॥ तयावीण अन्य दुजितायें ध्यातां ॥ व्यभिचार माथां शीघ्र बैसे ॥२॥ स्त्रियांलागीं जैसा जारत्वाचा दोष ॥ तेणें ते नरकास जाणें घडे ॥३॥ यास्तव लिंगीं धरितां आवडी ॥ तेणें पैलथडी प्राप्त होय ॥४॥ लिंगार्पित कर्म परम हाचि धर्म ॥ जाणोनिया वर्म सुखावला ॥ ५ ॥ मन्मथ शिवलिंग लिंग आणि आंग ॥ करून अभंग ऐक्य झाला ॥ ६ ॥

अभंग २६ वा.

सांडोनि सकळ गेलों याच वाटें ॥ जातां नीलकंठे करूं काय॥१॥ करूं जाता धर्म पाहूं जातां वर्म ॥ तेणें चित्तीं भ्रम वाटें बहू ॥२॥ करितां तीर्थाटन पाहतां प्रमाण ॥ व्रतामाजी भिन्न नाना अर्थ ॥३॥ देश कालमान प्राणाचें रोधन ॥ साधतां कठीण न ये हातां ॥४॥ शिणला हा जीव उबगलें मन ॥ न पडे समाधान कांहीं केल्या ॥५॥ मन्मथ शिवलिंग म्हणे न कळे गती ॥ धरियेले चित्तीं पाय तुझे ॥ ६ ॥

अभंग २७ वा.

पतिव्रता न पाहे पतीवीण अन्य ॥ काया वाचा मन एकाविध ॥ १ ॥ स्वप्नीं करूं नेणें आणिकाची स्तुती ॥ जागृती सुषुप्ती पतीविण ॥२॥ तैसें इष्टलिंगी ऐक्य होय मन ॥ काया वाचा पूर्ण एकलक्ष ॥३॥ बाह्य पूजा करी प्रसाद स्वीकारी ॥ नुपेक्षी क्षणैक शिवधर्म ॥४॥ तोची लिंगी प्राणी म्हणावा नैष्ठिक ॥ येर ते मायीक ज्ञानहीन ॥ ५ ॥ मन्मथ म्हणे तेथें निष्ठा तेंची फळ ॥ येर ते गबाळ नये कामा ॥ ६ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## अभंग २८ वा.

शिवभक्ताचें कुळीं जन्मुनी करंटा ।। न भजे चोरटा शंकरासी ।।१।। छपवूनी लिंगा घाली तुळशीमाळ ।। जन्मला चांडाळ मातेगर्भी ।।२।। सांडोनी भस्मातें लावितो चंदन ।। तयासी बंधने यम करी ।।३।। ऐसा जो दुर्जन अपवित्र खल ।। तयाचा विटाळ वीरशैवां ।।४।। कुंभी पाकादिकी तयासी जांचणी ।। देती ढकलूनी नरकांमाजी ।।५।। ऐसीं दुःखें जेथें होतसे अपार ।। सांगती विस्तार धर्मशास्त्रीं ।। ६ ।। मन्मथ शिवलिंग म्हणे तो नर ।। यमलोकीं चोर म्हणती तया ।। ७ ।।

## अभंग २९ वा.

शंकर हा मंत्र त्रिअक्षरी सोपा।। निरंतर जपा ध्यानीं मनीं ।।१।। तेणें हें सार्थक होईल देहात्रें ।। पुढील जन्माचें तुटे मूळ ।। २ ।। काळाचें शासन चुके याच नामें ।। देहीं ब्रम्ह व्हावें येणें खरें।।३।। यावेगळें वृथा दुःखासी कारण ।। न घडे समाधान तुज राया।।४।। मन्मथ शिवलिंग म्हणे नाम सार।। येणें भवपार होशी राया।।५।।

## अभंग ३० वा

कोण्याही साधनीं नातुटे हा देव ।। धरूनिया भाव जपा नाम ।। १ ।। करा नाम घोष कीर्तनीं आनंद ।। तयालागीं छंद हाची गोड ।।२।। वराडी हा ऐसा नामासाठीं धांवे ।। आठवितां पावे संकटास ।।३।। न सोडीच घर नाम निष्ठा सवें ।। मागें पुढें धांवे करी काज ।। ४ ।। मन्मथ शिवलिंग म्हणे नाम सोपें ।। करी एकरूपें भाविकासी ।। ५ ।।

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

### अभंग ३१ वा.

शिव शिव गर्जे वाचें ॥ काळ त्याचें पद वंदी ॥ १ ॥ देव येती लोटांगणीं ॥ चक्रपाणी हो विरंची ॥२॥ प्रेमें आलिंगिती तया ॥ म्हणती काया ही धन्य ॥३॥ करी जयजयकार ॥ वदे हर हर शब्द ॥ ४ ॥ मन्मथ म्हणे हें ऐसें ॥ व्यासें स्वयें वर्णीयलें ॥ ५ ॥

### अभंग ३२ वा.

हर मुखीं नाम घेई ॥ तेणें सर्व सुखी होई ॥ १ ॥ मग चुके येरझारा ॥ लक्ष चौऱ्यांशीचा फेरा ॥ २ ॥ ऐसा सुगम उपाय ॥ तुज सांगतसे स्वयें ॥३॥ आणखी साधनाचा शिण ॥ नाम पतीत पावन ॥ ४ ॥ म्हणे मन्मथ शिवलिंग ॥ नाम घेई प्रेमरंग ॥ ५ ॥

### अभंग ३३ वा.

शरण आले त्याचे राहूं नेदी दोष ॥ पातकाचे लेश अंगिकारी ॥ १ ॥ नाम घेतां वाचें न लावी उशीर ॥ करी भवपार भवसिंधू ॥ २ ॥ सेवकाची आस पुरवीं सांकडे ॥ निवारुनी पुढें उभा ठाके ॥३ । ऐसा हा कृपाळू कैलासीचा राणा ॥ कां रे त्यासी गाना गीतीं तुम्हीं ॥ ४ ॥ मन्मथ शिवलिंग म्हणे साधा काज ॥ नांदा साम्राज्य नाम बळें ॥ ५ ॥

### अभंग ३४ वा.

जोडोनिया हात करितों विनंती ॥ वेळोवेळां गीती गाई नाम ॥१॥ सुखें हा संसार करा स्त्रीसंगतीं ॥ वेळोवेळां गीतीं गाई नाम ॥२॥ कवडी कवडी द्रव्य जोडा लक्षशती ॥ वेळोवेळां

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

गीतीं गाई नाम ॥ ३ ॥ करा शास्त्र पाठ पहा धर्म नीती ॥ वेळोवेळां गीतीं गाई नाम ॥४॥ मन्मथ शिवलिंग म्हणे पुण्य-कीर्ती ॥ वेळोवेळां गीतीं गाई नाम ॥५॥

अभंग ३५ वा

मुळीं सिंपिलिया जळ ॥ शेखीं येतीं पल्लव फळ ॥ १ ॥ पुरतिल अंतरिचे अर्थ ॥ धरी इतुका परमार्थ ॥ २ ॥ एक नामीं वेंची वाचा ॥ वाहे भार संसारीचा ॥३॥ मग तूं तरलासी निःशंक ॥ सत्य घेईं माझी भाक ॥४॥ मिथ्या मानशील जरी ॥ साक्ष असे त्रिपुरारी ॥५॥ मन्मथ म्हणे वाणी ॥ लात्री देवाचें कारणीं ॥६॥

अभंग ३६ वा

साधन तें हेंची दोन्ही ॥ साधा तरी भक्तजनीं ॥१॥ परद्रव्य परनारी ॥ याचा विटाळ तूं धरी ॥२॥ भाग्यें देव घरां येती ॥ ऋद्धी सिद्धी हो राबती ॥३॥ म्हणे मन्मथ शिवालिंग ॥ देव होई हेंची आंग ॥ ४ ॥

अभंग ३७ वा.

भवरोग जाय जेणें ॥ ऐसें रसायन घेणें ॥ १ ॥ नका जाऊं आडवाटें ॥ खोटे सर्व उपाय ॥ २ ॥ तुम्हां सांगतों स्वहित ॥ ठेवा चित्त या बोला ॥ ३ ॥ नाम मात्रा प्रेमरसें ॥ घेतां नासे भवरोग ॥ ४ ॥ मन्मथ म्हणे सुखी होई ॥ सुखी शंकर हें गाई ॥ ५ ॥

अभंग ३८ वा

पातकी म्हणोनि देवा शरण जावें ॥ सद्भावेशीं गावें नाम त्याचें ॥ १ ॥ भाकावी करुणा करा विनवणी ॥ नसे आम्हां

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कोणी तयावीण ॥ २ ॥ शिव शूळपाणी कैलासींचा राणा ॥ दीनाच्या धावण्यां धांवे वेगीं ॥३॥ मग तो दीनबंधू हांकेसरसी ऊडी ॥ घालुनिया तोडी भवपाश ॥ ४ ॥ कुरवाळी हस्तकीं पालवानें झांकी ॥ बैसवूनी अंकीं सुखी करी ॥ ५ ॥ मन्मथ शिवलिंग म्हणे उमाकांत ॥ तारी असंख्यात शरणागता ॥६॥

## अभंग ३९ वा.

बहुता सुकृती लाधला हा तारू ॥ वोखटें तें भरूं नका केणें ॥१॥ अप्राप्त जें कांहीं लाधलें हातां ॥ सन्मार्गी थोकितां घडे लाभ ॥२॥ अविद्या उपाधि झडपिल्या वातें ॥ बुडे गलबते पाण्यामध्यें ॥ ३ ॥ धरा एक लक्ष चुकूं नका वाट ॥ भवसिंधू दुर्घट तरा वेगीं ॥ ४ ॥ मन्मथ शिवलिंग म्हणे शिरोभाग ॥ आतां येथें लाग सोडूं नका ॥५॥

## अभंग ४० वा.

देह नोव्हे साच रोगाचें भातुक ॥ अंतरीं विवेक करुनि पाही ॥१॥ काळाचे भागाला तुझी काय सत्ता ॥ कांता पुत्र वित्त भुललासी ॥ २ ॥ सर्प जाभाडीचा बेडूक आवडी ॥ मक्षिका सावडी जैशापरी ॥३॥ विषय सेवितां वय गेलें सारें ॥ भवसिंधू वारें भरलासे ॥४॥ शेवटील घडी कांहीं तरी करी ॥ बुडतोसी धरी तारू हातीं ॥ ५ ॥ मन्मथ शिवलिंग म्हणे नामनौका ॥ बैसोनिया हाका पैलपार ॥ ६ ॥

## अभंग ४१ वा.

भावेविण ज्ञान योगयाग ध्यान ॥ दुःखरूप जाण क्लेश करी ॥ १ ॥ शरीरीं दाटलें कनक भूषण ॥ कंठ सूत्रावीण व्यर्थ जैसे

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥ २ ॥ उभारिलें घर पताका तोरणीं ॥ नसे त्यांत कोणी वस्ती करी ॥ ३ ॥ लता वृक्षादिकीं वेष्टित कासार ॥ नसे त्यांत सार नीर जैसें ॥४॥ भक्तीविण जे कां करिती साधन ॥ भुसामाजी कण नसे जैसें ॥ ५ ॥ मन्मथ शिवलिंग म्हणे भक्ती करा ॥ सांडोनी पसारा दांभिकाचा ॥ ६ ॥

### अभंग ४२ वा.

उदास असावें साधकाचें चित्त ॥ कांता पुत्र वित्त असोनीया ॥ १ ॥ जळाचिया संगें कमला होय वाढी ॥ परी नेदी बुडी तयामाजी ॥ २ ॥ तैसे संसारांत असावें अलिप्त ॥ अदृष्टी जें प्राप्त सुखी होय ॥ ३ ॥ मान सत्काराची तूं न धरी चाड ॥ विषयाची वाढ होऊं नेदी ॥ ४ ॥ अलभ्य लाभाचा हर्ष खेद नाणीं ॥ चित्तीं शूळपाणी स्मरे सदा ॥ ५ ॥ मन्मथ शिवलिंग म्हणे सुदैव ॥ नासूं नये काव रंगासाठीं ॥ ६॥

### अभंग ४३ वा

द्विविध हें कर्म उपाधी जनासी ॥ गुंतोनिया फाशी होती बद्ध ॥१॥ केलिया कर्माचें भोगावें तें फळ ॥ पापें घडे छळ पुण्य सुख ॥२॥ स्वर्ग नर्क दोन्ही दोघांचें मंदिर ॥ पाहून अपार दोहीं जागीं ॥३॥ जाती भोगावया तेथें उपचार ॥ सरे जन्मां-तर चुके त्यासी ॥४॥ मन्मथ शिवलिंग म्हणे कर्मकुंड ॥ भक्तां आहे गोड भक्तीपंथ ॥५॥

### अभंग ४४ वा.

सदा भस्म लावा भाळीं ॥ लिंगपूजा बिल्वदळीं ॥१॥ होळी होय पातकाची ॥ मागील केल्या कर्माची ॥२॥ नलगे साधन

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सायास ॥ धारण करा रुद्राक्षास ॥३॥ चुके बहु जन्मीचे क्लेश ॥ भवभय याचेनें निरसे ॥४॥ भाव धरूनीया पोटीं ॥ शिवनाम वदा ओंठीं ॥५॥ प्रेमें धूर्जटी आळवा ॥ स्वार्थालागीं आपुलिया ॥६॥ मन्मथ आलासे भूलोकां ॥ आतां कोणी भिऊं नका ॥७॥ नारीनरां सकळीकां ॥ सांगतों हें अवधारा ॥ ८ ॥

अभंग ४५ वा.

सोपें आहे बहू फार ॥ भवपार तराया ॥१॥ सर्व व्रतामाजी सार ॥ सोमवार व्रतराज ॥२॥ दिवा राहे उपोषित ॥ नामीं चित्त ठेऊनिया ॥३॥ सायंकाळीं बिल्वदळीं ॥ चंद्रमौळी अर्चावा ॥४॥ अंतीं पारणें करूनी ॥ शूळपाणी प्रसादें ॥५॥ जीव शिवा ऐक्य होय ॥ ऐसी सोय येयायी ॥६॥ मन्मथ म्हणे हेंची करा ॥ करूनी तरा संसारा ॥७॥

अभंग ४६ वा.

शंभु महादेवा पार्वतीच्या धवा ॥ जीवीचिया जीवा पाव वेगीं ॥१॥ बुडालों संकटीं प्रपंचाचें डोहीं ॥ धरुनीया बाहीं काढी मज ॥२॥ भाकितों करुणा पसरुनीया मुख ॥ देई निज सुख मज देवा ॥३॥ अनाथाचा नाथ भक्तांचा कैवारी ॥ पुराणीं ही थोरी गाती तूझी ॥४॥ म्हणोनिया तुज आलों मी शरण ॥ आतां थोरपण तुम्हांकडे ॥५॥ हातीं धरी अथवा सोडी नाहीं भीत ॥ जें तुज उचित तें तूं करी ॥६॥ मन्मथ शिवलिंग म्हणे नामासाठीं ॥ भय तुझ्या पोटीं नाहीं काय ॥७॥

अभंग ४७ वा

देवा मज तारी या भवापासूनी ॥ विषय चोरांनीं नागवीलें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नागवोनीं मज दीन केलें यांनीं ॥ चौऱ्यांशीचे योनीं फिरवीलें ॥२॥ शीण झाला मज घेतां जन्म फेरे ॥ चुकवी येरझार माझी आतां ॥३॥ देवा तुज आतां मागणें एवढें ॥ अनाथा परिपाडें उद्धरावें ॥४॥ सर्वस्वी अन्याय क्षमा करी रंका ॥ आलों शरण देवा पशूपती ॥५॥ सर्वस्वीं अन्यायीं म्हणवीतो तुझा ॥ आपुल्या ब्रीद लाजा सांभाळावें ॥ ६ ॥ मन्मथ म्हणे ब्रीद करा हें जतन ॥ तुम्हांलागीं आण षण्मुखाची ॥७॥

### अभंग ४८ वा.

नाहीं मजज्ञान नेणोगा साधन ॥ करितों भजन भोळ्या भावें ॥ १ ॥ नाहीं आंगीं शक्ति करूं तीर्थाटन ॥ करितों पूजन भोळ्या भावें ॥ २ ॥ न कळे चातुर्य करावया स्तुती ॥ अल्प माझी मति उमारमण ॥३॥ मन्मथ शिवलिंग म्हणे देवराया ॥ विनवीतों पायां भोळ्या भावें ॥ ४ ॥

### अभंग ४९ वा

आपुल्या ब्रीदाचा अभिमान ऐसा ॥ उपेक्षिलें दासा घडे केवीं ॥ १ ॥ माता जैसी जाय तान्हुल्याचें सवें ॥ राखी जीवें भावें प्रेम त्याचें ॥ २ ॥ न विसंबे देव धावें भक्तापाठीं ॥ धरूनिया पोटीं आस त्याची ॥३॥ निवारी सांकडे पडो नेदी उणें ॥ वाढवी महिमान सेवकांचें ॥४॥ मन्मथ शिवलिंग म्हणे शिवा ऐसा ॥ कृपाळू सहसा नाहीं दुजा ॥५॥

### अभंग ५० वा

घेवोनिया सोंग जन्मवरी देवा ॥ केली तुझी सेवा स्वहितालागीं ॥१॥ द्यावयाचे वेळीं चुकविसी तोंड ॥ तेणें कानकोंड

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

जगामाजी ॥२॥ शेवटील सोंगीं उचिताची वेळ ॥ लपोनी केवळ बैसलासी ॥३॥ आतां एक करी दावी आपुलें तोंड ॥ मागणें उदंड असो तेंही ॥४॥ भेटी अंतीं सर्व पावलों भरून ॥ आमुचें हें ऋण तुज नाहीं ॥५॥ मन्मथ शिवलिंग म्हणे भेटीवीण ॥ येथें दुजी खूण न चले कांहीं ॥६॥

### अभंग ५१ वा.

सर्वगत तुझें राहो तुजपाशीं ॥ आम्हां एकदेशीं आवडे ध्यान ॥१॥ मुखीं नाम गाऊं रूप पाहूं डोळां ॥ पूजूं जाश्वनीळा एकविध ॥२॥ सर्वगत पाहतां वेडावले ऋषी ॥ उबगोनी मानसीं ठेले उगे ॥३॥ तें रूप कासया आम्हां लागीं व्हावें ॥ कोणासी पूजावें गावें कोणां ॥४॥ मन्मथ शिवलिंग म्हणे उमापती ॥ सांठविली मूर्ती चित्तीं तूझी ॥५॥

### अभंग ५२ वा

सतसंगें न धरी निष्ठा ॥ मिरवी आपुली प्रतिष्ठा ॥१॥ अयोग्यासी अर्पी पदवी ॥ श्रेष्ठांहातीं पाय धुवी ॥२॥ मानी स्वधर्माचा त्रास ॥ धरी अधर्मीं उल्हास ॥३॥ दासी दासा घाली अन्न ॥ करी साधूचा अपमान ॥४॥ विषयासाठीं द्रव्य जोडी ॥ धर्मीं वेंचीना कवडी ॥५॥ कामीं ठेवूनीया मन ॥ करीतसे नाना यत्न ॥६॥ म्हणे मन्मथ शिवलिंग ॥ ऐसा आचरे तो मांग ॥७॥

### अभंग ५३ वा

काय केलें रांडलेका ॥ जन्म गमाविला फुका ॥१॥ नाहीं केलें वा साधन ॥ काय माझ्या ह्या बांधून ॥२॥ नाहीं अर्चिलें शंकरा ॥ पैका वेंचीला संसारा ॥३॥ नाहीं पूजिले अतिथी ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥ सदा स्त्रियांची संगती ॥४॥ म्हणे मन्मथ शिवलिंग ॥ बोलो जातां येतों राग ॥५॥

अभंग ५४ वा.

आलीया संकट ॥ नाम घेई नीलकंठ ॥ १ ॥ आलें विघ्न जाये ॥ ऐसें नाम थोर आहे ॥२॥ हरनाम घेतां ओंठीं ॥ सुख भरे पाठीं पोटीं ॥३॥ दुःखां नुरेची बा ठाव ॥ दृढ जडे आत्मभाव ॥४॥ म्हणे मन्मथ शिवलिंग ॥ नाम ब्रह्मीचें बा आंग ॥५॥

अभंग ५५ वा.

सोडोनिया आत्म वर ॥ जी का रिघाली परघर ॥१॥ तया पतिव्रता स्तुती ॥ कानीं येतां दुःख चित्तीं ॥२॥ तैसा स्वधर्मीं भ्रष्टला ॥ अन्य धर्मीं प्रवर्तला ॥३॥ गेला एकविध भाव ॥ सैरा फावे तिकडे धांव ॥४॥ आंगीं भरला अविश्वास ॥ दोन्ही लोकीं केला नाश ॥५॥ मन्मथ म्हणे पाहतां येणें ॥ घडे अधःपाता जाणें ॥६॥

अभंग ५६ वा.

फट् रे द्वाडा पापिष्टा ॥ नाहीं घडली आत्मनिष्ठा ॥१॥ सुख मानुनी संसारीं ॥ भरवी लौकिक बाजारीं ॥२॥ कन्या पुत्र हीं सोयरी ॥ भावें त्याची सेवा करी ॥३॥ जन्मवरी शीण केला ॥ अंतकाळीं व्यर्थ गेला ॥४॥ म्हणे मन्मथ शिवलिंग ॥ नरकीं पचे त्याचें आंग ॥५॥

अभंग ५७ वा.

निजूं नका जागा जागा ॥ आपुल्या स्वधर्मानें वागा ॥१॥ वेद शास्त्र इतीहास ॥ हाची करिती उपदेश ॥२॥ आणखी व्यासा-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दिक मुनी ॥ हेंची सांगती पुराणीं ॥३॥ ऊर्ध्वगती स्वधर्मांत ॥ परधर्मी अधःपात ॥४॥ मन्मथ म्हणे जाणा वर्म ॥ बरा वाईट तो स्वधर्म ॥५॥

अभंग ५८ वा.

स्वधर्माचा त्याग उपजे खळां अंगीं ॥ सांगतसे जगीं भक्ती-मार्ग ॥१॥ विश्वीं विश्वंभर जना बोध करी ॥ शिवयोगी द्वारीं येऊं नेदी ॥२॥ इष्टलिंगा पाणी नसे बिल्वदळ ॥ पूजितसे खळ देवांतरा ॥३॥ माय बापा अन्न न घाली चांडाळ ॥ अन्नछत्रीं जळ वाढीतसे ॥४॥ पुण्य करितां पाप जोडे तयालागीं ॥ कल्प-वरी भोगी नर्कवास ॥५॥ मन्मथ शिवलिंग म्हणे वेडावले ॥ हातें बुडविलें घर त्यानें ॥६॥

अभंग ५९ वा.

साधूच्या वचनीं सज्जना उपदेश ॥ खळालागीं द्वेष वाटे चित्तीं ॥१॥ चंद्रोदयीं सुख पावती चकोर ॥ दुःखी होती चोर दुष्ट बुद्धी ॥२॥ सूर्याचे प्रकाशें वर्तती सकळ ॥ दिवाभीत बीळ धरु न राहे ॥३॥ मन्मथ म्हणे हित सज्जनासी होय ॥ दुर्जन तो जाय अधोगती ॥४॥

अभंग ६० वा

सांडोनी स्वधर्म परधर्मी रत ॥ पाप तें तयास आचरतां ॥१॥ ऐसा गीतिमाजी अर्जुनासी भाव ॥ कथिला वासुदेवें सारांश ॥२॥ नेणोनिया जन आडमार्गी चालती ॥ आंधळयानें हातीं धरिलें अंधा ॥३॥ तैसें शास्त्रांतील नेणोनिया वर्म ॥ सांगुनी अधर्म राहवीती ॥४॥ गर्दभ गाळामाजी गुंतला एकला ॥ अवघेची

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तयाला साह्य होती ॥५॥ मन्मथ म्हणे तैसें भांबावलें जन ॥ आपुलें कल्याण न पाहती ॥६॥

अभंग ६१ वा.

जयासी नावडे शंकराची स्तुती ॥ तो जाणा दुर्मती भाग्यहीन जयाचीये वाचें न ये शिवनाम ॥ तो जाणा अधम महादोषी ॥२॥ कदां न ऐकेची कानीं शिवकथा ॥ तो जाणा सर्वथा आत्मघाती ॥३॥ कल्पवरी भोगी यमाची यातना ॥ न चुके बंधना पासोनिया ॥४॥ मन्मथ म्हणे ऐसी पापिष्ठाची गती ॥ पुराणें बोलती धर्मशास्त्र ॥५॥

अभंग ६२ वा

तोची शिवभक्त शिवासी अंकित ॥ जीव हें शिवत्त्व केलें जेणें ॥१॥ हातीं बिल्वपत्र गळां शिवसूत्र ॥ मस्तकीं पवित्र भस्म शोभे ॥२॥ रुद्राक्षाच्या माळा रुळताती गळां ॥ शिवपूजा सोहळा एकनिष्ठ ॥३॥ तीर्थप्रसादाचा नित्यनेम ज्यासी ॥ सदा वसे काशी सदनीं त्याच्या ॥४॥ मुखीं शिवनाम अंतरीं सप्रेम ॥ अहर्निशीं नेम नाहीं दूजा ॥ ५ ॥ मन्मथ म्हणे ऐसा जाणा वीरशैव ॥ येर जाण वाव धर्मलोपी ॥ ६ ॥

अभंग ६३ वा

वीरशैव मार्ग क्रीया करी निष्ठ ॥ त्यासी मानी श्रेष्ठ उमापती ॥१॥ पर स्त्री जननी ध्यान शिवार्चनीं ॥ संताचे सेवनीं मानी हर्ष ॥२॥ तोचि मान्य झाला स्वर्ग मृत्युलोकी॥ परद्रव्यें देखा नाणी दृष्टी ॥३॥ वाचेलागी छंद शंकर नामाचा ॥ मनीं आनंदाचा पूर

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वाहे ॥४॥ मन्मथ शिवलिंग म्हणे पूज्य जगा ॥ भक्तीचिया अंगा देवकरीं ॥५॥

अभंग ६४ वा.

सुखें असा गृहाश्रमीं लक्ष लावा शंकर नामीं ॥१॥ नटा नामीं शंकराच्या आपदा चुकवा भयाच्या ॥ २ ॥ संसार धंदा सर्व करा ध्यानीं निजध्यास धरा ॥३॥ राग करूं नका बोला ॥ रात्रंदिवस विवेकाला ॥४॥ मन्मथ म्हणे संतालागीं ॥ एवढी विनंती परिसा वेगीं ॥५॥

अभंग ६५ वा.

आम्ही वंद्य म्हणो त्यासी ॥ सर्व भावेसी शरण ॥१॥ मग हो कां भलते याती ॥ ज्याचें चित्तीं शूळपाणी ॥ २ ॥ अनुसरें एकभाव ॥ वेंची जीव परकाजा ॥ ३ ॥ सर्वांभूतीं शिव पाहीं ॥ दुजा नाहीं त्या भावार्थ ॥४॥ मन्मथ म्हणे ऐसा भाव ॥ तेथें देव तोची एक ॥ ५ ॥

अभंग ६६ वा.

इष्टलिंग हृदयावरी ॥ अन्य देवा नमस्कारीं ॥ १ ॥ महा पाप तया जोडें ॥ तेणें अधःपात घडें ॥२॥ करितां दुजें ठायीं रती ॥ तेणें घडें अधोगती ॥३॥ अंग लिंगासी अर्पिलें ॥ तेव्हां तयाचेंची झालें ॥४॥ मन्मथ म्हणे नेणती वर्म ॥ न पाहती धर्माधर्म ॥५॥

अभंग ६७ वा.

शिव शिव म्हणतां वाचें ॥ काय गेलें तुझ्या बाचें ॥१॥ शिवनाम असें श्रेष्ठ ॥ पापी उद्धरती नष्ट ॥२॥ शिवनाम घेतां वाचें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दोष जाती वैष्णवाचें ॥३॥ शिवा वांचून आहे कोण ॥ विठ्ठल मस्तकीं शिव जाण ॥ ४ ॥ मन्मथ शिवलिंग म्हणे ॥ शिवा वांचून व्यर्थ जिणें ॥५॥

### अभंग ६८ वा.

न करिती सोमवार ॥ न पुजिती गौरीवर ॥ ऐसें पातकी जे नर ॥ यमपुरी तयासी ॥१॥ मुखीं न घेती शिवनाम ॥ चित्तीं नाहीं ज्याच्या प्रेम ॥ ऐसें दोषी जे अधम ॥ कुंभ पाक तयासीं ॥२॥ शिवनिंदा करिती वाचें ॥ माहार जाणा ते जातीचे ॥ प्रायश्चित्त तया दोषाचें ॥ नसें वेद पुराणीं ॥३॥ मन्मथ म्हणे जन्मा आले ॥ जननी लागीं श्रमविलें ॥ जन्मताच कां नाहीं मेलें ॥ रांड लेक अपवित्र ॥४॥

### अभंग ६९ वा.

वर वर दावी शिवाचार ॥ परी अंतरीं अनाचार ॥१॥ भगवें तो जाश्वनीळ ॥ जो कां निंदितो चांडाळ ॥२॥ न पहावें वदन त्याचें ॥ ते प्रिय यम दूताचे ॥३॥ काय गेरू कळली त्याला ॥ गेरू अंतरीं रंगला ॥४॥ ऐसा गेरू आहे श्रेष्ठ ॥ नकळे तो महा भ्रष्ट ॥५॥ म्हणे मन्मथ शिवलिंग ॥ भगवें रूप उमारंग ॥६॥

### अभंग ७० वा.

जन्मा आलिया तूं करी हें स्वहित ॥ दारा पुत्र वित्त नये कामा ॥१॥ निष्काम होऊनी शिवनाम उच्चारी ॥ धरूनी अंतरीं दृढप्रेम ॥२॥ प्रेमाचा अंकीत पार्वतीचा पती ॥ न सोडी संगती प्रेमळाची ॥३॥ होऊनिया वेडा भोंवता भोंवता ॥ करी न सांगता काज त्याचे ॥४॥ मन्मथ म्हणे देव प्रेमाचा भुकेला ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

आणिक कोणाला नाटोपेची ॥५॥

अभंग ७१ वा.

शिव नाद शिव छंद ॥ वाचे शिव स्मरावा ॥१॥ शिव अवघा प्रेमानंद ॥ सदाशिव स्मरावा ॥२॥ शिव हृदयीं रात्रंदिन ॥ मुखीं ध्यान सदाशिव ॥३॥ शिव सुखां शिव दुःखां ॥ मन्मथ मुखां सदाशिव ॥४॥

अभंग ७२ वा

बा रे गेलों गेलों वाया ॥ मज तारी शंभूराया ॥१॥ नको अंत पाहूं माझा ॥ दास अंकीत मी तुझा ॥२॥ मज म्हणती पतित ॥ तुज नोव्हे गा ऊचित ॥३॥ पावन असशील जरी ॥ तरी धांव गा लौकरी ॥४॥ म्हणे मन्मथ शिवलिंगा ॥ आतां देऊं नको दगा ॥५॥

अभंग ७३ वा

वासनेचा फासा घालूनी जिवासी ॥ आम्हां फिरवीसी नाना योनीं ॥ १ ॥ आम्हीं तुझें काय केलें होतें देवा ॥ म्हणोनीया दावा साधीयेला ॥२॥ आतां तरी मज सोडवी एथूनी ॥ काम क्रोध यांनीं नागवीलें ॥३॥ सिंहाचिया वस्तु जंबुकानें नेली ॥ कीर्ती ही बुडाली देवा तूझी ॥४॥ म्हणोनी लौकरी मन्मथाशी तारी ॥ त्या कीर्तीनें भरी त्रिभूवन ॥५॥

अभंग ७४ वा

आमुचें प्रारब्ध झांकोनिया ठेवा ॥ पाऊल हें दावा उमाकांता ॥१॥ लोकभयासाठीं भूमीआड केलें ॥ पाहिजे दावीलें पुत्रालागीं ॥२॥ लाडकें लेंकरूं करी अपराध ॥ माता त्याचा खेद

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

काय मानी ॥३॥ असंख्य पातक भरलें माझें अंगीं ॥ म्हणवितों जगीं दास तुझा ॥४॥ आपुलीया दासा पडलीया ऊणें ॥ जाईल दूषण त्रैलोक्यांत ॥ ५ ॥ मन्मथ शिवलिंग म्हणे बरवेंपण ॥ आपुलें आपण ओळखावें ॥ ६ ॥

## अभंग ७५ वा

माझ्या मना लागो चाळा ॥ पहावया संत डोळां ॥ १ ॥ आणिक नाहीं मज चाड ॥ न लगे संसार धड गोड ॥ २ ॥ तरीच फळ जन्मा आलों ॥ उमारंगीं धन्य झालों ॥३॥ मन्मथ म्हणे महादेवा ॥ देई सज्जनाची सेवा ॥ ४ ॥

## अभंग ७६ वा.

आम्हां नसेची विटाळ ॥ आंगीं पातकाचा मळ ॥ १ ॥ आम्ही शिवभक्त केवळ ॥ मुद्रांकित तेथींचें ॥२॥ आम्ही नेणों कर्मा कर्म ॥ वर्म विधी निषेधाचें ॥३॥ लिंगपूजा हा स्वधर्म ॥ एकाविध आमुचा ॥४॥ नेणों आणिकांची स्तुती ॥ गीतीं गाऊं गौरीपती ॥५॥ हरी ब्रह्मादिका ध्यातीं ॥ पादपद्में जयाचीं ॥६॥ आम्हीं न भिऊं कळीकाळा ॥ जिंकूं कृतांताचा मेळा ॥ ७ ॥ दीन अनाथां दुर्बळा ॥ पार करूं भवसिंधू ॥ ८ ॥ या रे मोठे लहानथोर ॥ भलते याती नारीनर ॥९॥ एथें साधन विस्तार नलगे कोण्या सायासें ॥ १० ॥ मन्मथ म्हणे कौलनामा ॥ अनुसरून करा जमा ॥११॥ एथें सकाम निष्काम ॥ भेद नसे अणुमात्र ॥१२॥

## अभंग ७७ वा

संसाराचें ठायीं असतें जरी सुख ॥ टाकुनिया देख जातें केवीं

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥१॥ पार्वतीचा पुत्र षडानन ज्ञानी॥आहाच म्हणोनी जातां केवीं॥२॥ थोर थोर मुनी कुटुंब सोडूनी ॥ निरंतर वनीं राहते केवीं ॥३॥ ऐसे मुनीश्वर सांडूनी संसार॥झाले दिगंबर तयासाठीं ॥४॥ मन्मथ शिवलिंग म्हणे संसारांत ॥ सुख अणुमात्र नसे कांहीं ॥५॥

अभंग ७८ वा.

तोंवरीच देवा तुजलागी भ्यावें ॥ मागायाची हाव नसे चित्तीं॥१॥ तितुकें सांडीतां तुझें भय काय॥ रंक आणि राव तुल्य आम्हां॥२॥ नागवें झालीया गेली सर्व लाज ॥ शंकावया काज नसे कांहीं॥३॥ उदास होऊनी फिरतों वेडेपणें ॥ चित्तीं देहभान नसे कांहीं ॥४॥ तेथें तुझें कोण करितो स्मरण ॥ देव भक्तपण कैचें वेड्या ॥५॥ मन्मथ शिवलिंग म्हणे वेडावलों ॥ असतांची मेलों संसारासी॥६॥

अभंग ७९ वा.

वेडा झालों वेडा झालों ॥ वेडियाच्या गांवा गेलों ॥१॥ वेडा बैसलासे भोळा ॥ कृपा करी शिवलीला ॥२॥ वेडियानें वेडें केलें ॥ अवघें शिवरूपीं नेलें ॥३॥ मन्मथ म्हणे वेडा खरा ॥ गुप्तरूपें आला घरा ॥ ४ ॥

अभंग ८० वा.

वर्णांमाजी श्रेष्ठ ब्राह्मण मी एक ॥ वाखाणी कौतूक लोकामध्यें ॥१॥ क्षमा दया शांती ईश्वराची भक्ती ॥ नसे एक रती भूतदया ॥२॥ तेथींचें तें वर्म चुकुनीया गेला ॥ भवपाशीं गुंतला चौऱ्यांशीच्या ॥३॥ उत्तम मिष्टान्न चांडाळें शिवीलें ॥ तैसें तेथें झालें अभिमानें ॥४॥ मन्मथ शिवलिंग म्हणे मीपणाचें ॥ घेऊनिया नाचें ओझें माथां ॥ ५ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

### अभंग ८१ वा.

न पडो विसर तुझिया पायांचा ॥ गीतीं गाऊं वाचा नाम तुझें ॥१॥ तुझिया सेवेचा नसावा वियोग ॥ इच्छितों संयोग जन्मोजन्मीं ॥२॥ हेंचि देई देवा न मागे आणीक ॥ स्वामी मी सेवक तूं हें करी ॥ ३ ॥ त्रैलोक्याचा स्वामी दाता तूं उदार ॥ मागती तुज फार स्वर्ग मोक्ष ॥४॥ मज दुर्बळासी इतुकेंची देई ॥ विनवितों डोई ठेवुनि पायां ॥५॥ कृपाळू होऊनी मन्मथा अपंगी ॥ महाराज योगी याचें निजा ॥ ६ ॥

### अभंग ८२ वा.

जळो त्याचें ज्ञान जळो त्याची भक्ती ॥ लिंगांगाची स्थिती न कळे ज्यासी ॥ १ ॥ अध्यात्माची पोथी सोडूनी बाजारीं ॥ वैराग्याची थोरी सांगे लोकां ॥२॥ भक्ती भावार्थाचें घेऊनिया सोंग ॥ जगामाजी ढोंग भोंदावया ॥ ३ ॥ व्यर्थ त्याचा जन्म शिवभक्ताचे कुळीं ॥ वंशाची रांगोळी केली तेणें ॥४॥ अमृताचें ताटीं ओगरिलें विष ॥ तैसे त्या कुळास नागवीलें ॥५॥ रूपवंत नार व्यभिचार करी ॥ लावण्याची थोरी जळो तीच्या ॥ ६ ॥ मन्मथ शिवलिंग म्हणे भूमीभार ॥ लिंगांगी विचार नाहीं जया ॥ ७ ॥

### अभंग ८३ वा.

तेणें सर्व केलें सांग ॥ वरिला लाग भक्तीचा ॥ १ ॥ तपें तपला अमूप ॥ जपें जपला सकळ ॥२॥ केल्या बहू तीर्थावळी ॥ आहुती अनळी ओपिल्या ॥ ३ ॥ अमोघ ओगरिलें अन्न ॥ याचकां धन अर्पिलें ॥४॥ पुण्य क्षेत्रें धुंडाळिलीं ॥ व्रतें घडलीं

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अपार ॥५॥ मन्मथ म्हणे प्रेमभावें ॥ देव पावे सोयरा ॥ ६ ॥

अभंग ८४ वा.

जारिणीसी पतीसेवेचा कंटाळा ॥ व्यभिचार सोहोळा गोड वाटे ॥१॥ जाराकडे पाहे डोळे मोडी हासे ॥ पतीबोला त्रास मानी मनीं ॥२॥ तैसें इष्टलिंग पूजेचा कंटाळा ॥ देवांतर गोळा करी बहू ॥ ३ ॥ काय नेणों गती त्याची पुढें होय ॥ वाटतो विस्मय मनामाजी ॥ ४ ॥ मन्मथ म्हणे वाचें बोलावें तें काय ॥ जनां दिसे सोय अधर्माची ॥ ५ ॥

अभंग ८५ वा

देऊळा आधार देवाचाची झाला ॥ देवळानें केला देव उभा॥१॥ देवें आणियेली देऊळासी शोभा ॥ देऊळाची प्रभा देवावरी ॥२॥ तंतुमाजी शेला शेल्यामाजी तंतू ॥ एक एका आंतु एकपणें ॥३॥ ऐकताहें कैसें सांच पडे लोकीं ॥ देखणी विवेकीं जाणें खूण॥४॥ अलंकार सोनें सोन्या अंलकार ॥ पाहतां विचार ठायीं पडे॥५॥ सग्दुरू प्रसादें मन्मथें देखीलें ॥ दोहीं भाग ठेलें एकरूप ॥६॥

अभंग ८६ वा.

भक्ताचिया घरी मुक्ती राबताती ॥ वेदांत हे गाती श्रुती मुखें ॥१॥ काजाभक्ताचिया आपण करी दास्य ॥ विघ्न वारीतसे बहू-ळेचे ॥२॥ बहुळा ती नेली कैलासालागूनी ॥ आपुल्या आसनीं बैसविली ॥३॥ दाशार्णव राजा शबरी सिंहकेत ॥ त्याचे मनो-रथ रक्षिसी तूं ॥ ४ ॥ गोकर्णी चांडाळी तिचा उद्धार केला ॥ कल्मषपाद नेला कैलासासी ॥५॥ मन्मथ म्हणे ऐसे दोषी उद्ध-रीसी ॥ आम्हां उपेक्षीसी कशास्तव ॥६॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अभंग ८७ वा

सायंकाळीं शिव पूजा ॥ सुख होय नंदीध्वजा ॥१॥ वाढी भुकेलिया अन्न ॥ हो कां कैसेंही भोजन ॥२॥ तेथें अर्पिल्याचें फळ ॥ राहूं नेंदी दोष मळ ॥३॥ करी कृपा लोभ फार ॥ भव ओसरें अपार ॥४॥ मन्मथ म्हणे ऐसी घडी ॥ आनंदासी कोंब फोडी ॥५॥

अभंग ८८ वा

हर जित्ता मेल्या तारी ॥ एक भक्त भवसागरीं ॥१॥ अवघें कुळ करी पावन ॥ पापी दोषी तारी जन ॥ २ ॥ हें तों एकासाठीं घडें ॥ सुख सकळांसी जोडे ॥३॥ गायी वत्सालागीं पान्हा॥ क्षीरपान सर्व जनां ॥४॥ मन्मथ म्हणे भगीरथ ॥ सगरा आणिलें गंगातीर्थ ॥५॥

अभंग ८९ वा.

भाळीं भस्म रेखा ॥ तुम्हीं तयासी ओळखा ॥१॥ करा साष्टांग वंदना ॥ सव्य घाला प्रदक्षिणा ॥२॥ होसी दूता आज्ञा करी ॥ यम भिऊनी अंतरीं ॥३॥ गीत गाती नारी नर ॥ मुखीं नामाचा उच्चार ॥४॥ असे रुद्राक्ष मंडित ॥ बिल्वमाळा विराजित ॥५॥ देह असो भलतेपरी ॥ जे कां शैव वेषधारी ॥६॥ मन्मथ म्हणे ऐसी मात ॥ दूता सांगे वैवस्वत ॥७॥

अभंग ९० वा.

धन्य तयाचा संसार ॥ जेथें गजर नामाचा ॥१॥ कांता पुत्र बंधू जन ॥ अवघे शरण देवासी ॥२॥ घरीं उद्योग करिती ॥ वाचें वदती शिव शिव ॥३॥ भावें करिती शिवपूजा ॥ नसे दुजा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भावार्थ ॥४॥ वाढी याचकांसी अन्न ॥ करी भोजन अवश्य ॥५॥ मन्मथासी सेवा घडो ॥ द्वारीं पडो ये याच्या ॥ ६ ॥

## अभंग ९१ वा

कानीं ठेवुनिया मन ॥ करा कीर्तन श्रवण ॥१॥ ऐकिलें तें धरा मनीं ॥ वाचें वदा शूळपाणी ॥२॥ सदा ध्यान करा त्याचें ॥ भय नाहीं कळिकाळाचें ॥३॥ देव बोला माथां वाहे ॥ जेथें वांछी तेथें जाये ॥४॥ मन्मथ म्हणे गुण कीर्तनीं ॥ देव जोडा सर्व जनीं ॥५॥

## अभंग ९२ वा.

अहो दीपकीं पतंग ॥ सुखें जाळी आपुलें अंग ॥१॥ कमळीं घ्यावया सुगंध ॥ लोभें भृंग पावे बंध ॥२॥ काय लाभ तया झाला ॥ शेखीं प्राणासी मुकला ॥३॥ तैसें विषयाचें सुख ॥ पाहूं जातां अवघें दुःख ॥४॥ करी आतांची विवेक ॥ पुढें न घडे जेणें शोक ॥५॥ शरण सद्गुरुसी जाई ॥ चित्त ठेवी त्याचे पायीं ॥६॥ म्हणे मन्मथ शिवलिंग ॥ ब्रह्मरूप होय अंग ॥७॥

## अभंग ९३ वा.

तया भावें शरण जावें ॥ सदा वाचें नाम घ्यावें ॥१॥ करी दीनावरी कृपा ॥ उरो नेदी दैन्य पापा ॥२॥ नवविधा माजी सार ॥ नाम मात्रें होती पार ॥३॥ मन्मथ म्हणे धरा जीवीं ॥ हेचि भक्ति सदाशिवीं ॥४॥

## अभंग ९४ वा.

काम जिंकिला कवणें ॥ ऐका त्यांचीं महिमानें ॥१॥ रंभा आली शुकापाशीं ॥ माय म्हणुनी वंदी तिसी ॥२॥ काम षण्मुखें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ग्रासिला ॥ जनक विदेहीं तो झाला ॥ ३ ॥ काम त्रासिला भीष्मानें ॥ मन्मथ म्हणे वरदानें ॥४॥

अभंग ९५ वा.

कामें नाडिलें जनांला ॥ अंतर पडे परमार्थाला ॥१॥ कामें केलें देशोधडी ॥ फिरवी संसार बांधोडी ॥२॥ कामें नाडिलें थोराशी ॥ इतरांची गती कैसी ॥३॥ कामें नारद भुलविला ॥ साठी संवत्सर व्याला ॥४॥ कामें ब्रह्मा चेतविला ॥ कन्येपाठीं तो लागला ॥५॥ काम ऐसा अनीवार ॥ नागविले ऋषीश्वर ॥६॥ कामें विष्णू दीन केला ॥ वसवी वृंदें स्मशान ॥७॥ कामें गवसिलें शिवासी ॥ हिंडे भिल्लिणि पाठिशीं ॥ ८ ॥ काम कैसीयानें सरे ॥ मन्मथ म्हणे नाम स्मरें ॥९॥

अभंग ९६ वा.

हर रे वीरशैव धर्म ॥ चाले तोचि तो उत्तम ॥ १ ॥ शील क्रीया करी नेम ॥ लिंगपूजें लावी प्रेम ॥ २ ॥ न करी कवणाची निंदा ॥ शिवस्मरणीं हाचि धंदा ॥३॥ हर रे इंद्रियांसी मारी ॥ संताघरीचा कामारी ॥४॥ मन्मथ म्हणे ऐसा वर्ते ॥ तयालागी म्हाणिजे मुक्त ॥५॥

अभंग ९७ वा.

हर रे शंकर मंत्र सोपा ॥ करी निर्मळ अवघ्या पापा ॥१॥ हर रे शंकर दैवत भोळा ॥ स्मरतां नासे कळीकाळा ॥२॥ हर रे शंकर छंद मनीं ॥ गोड ऐकतां श्रवणीं ॥ ३ ॥ मन्मथ म्हणे भलते याती ॥ धन्य शंकर ते ध्याती ॥४॥

अभंग ९८ वा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

उमारंग आमुची माय ॥ आम्हां सुखां उणें काय ॥१॥ घेतां नामामृत ध्वनी ॥ प्रेम वोसंडीत मनीं ॥ २ ॥ क्रीडूं गणांचिया मेळीं ॥ करूं आनंदाची टाळी ॥३॥ मन्मथ म्हणे कृपावंत ॥ ठेवी आम्हांपाशीं चित्त ॥४॥

अभंग ९९ वा.

हर रे निर्मळ ही काया ॥ माझी करी देवराया ॥ १ ॥ हर रे कानाचे श्रवणीं ॥ तुझी पडो नामध्वनी ॥ २ ॥ हर रे डोळयाचें पाहणें ॥ अवघा तूंची परिपूर्ण ॥३॥ घडो हस्तानें ही पूजा ॥ निरंतर शिवराजा ॥४॥ घडो पायांचें भ्रमण ॥ तुझें क्षेत्रालागीं जाण ॥५॥ म्हणे मन्मथ शिवलिंग॥ देई हाचि गा उद्योग ॥६॥

अभंग १०० वा.

ज्ञान गर्वें झाला धीट ॥ बांधुन व्युत्पत्तीची मोट ॥१॥ वेद शास्त्रें अभ्यासिलीं ॥ थोर प्रतिष्ठा जोडिली ॥२॥ जळो त्याचें थोरपण ॥ वाचें नाणी उमारमण ॥३॥ शिव कीर्तनाच्या ठायीं ॥ चित्तीं लोभ ज्याच्या नाहीं ॥४॥ नाहीं भक्तीचा ओलावा ॥ पातकी तोचि जाणावा ॥ ५ ॥ परस्त्री परधन हरणीं ॥ सदा इच्छितसे मनीं ॥ ६ ॥ सर्वकाळ निंदा करी ॥ कोणा राहूं नेदी उरी ॥७॥ मन्मथ म्हणे अभिमान ॥ करी दोषाचें साधन ॥८॥

अभंग १०१ वा.

जय जय मदनांतका ॥ सर्व व्यापका सर्वेशा ॥१॥ उमापती गंगाधरा ॥ चंद्रशेखरा सांबमूर्ती ॥ २ ॥ पशुपती परशूधरा ॥ परात्परा पर-पुरुषा ॥ ३ ॥ सदाशिवा शूळपाणी ॥ भाळनयनी त्रिलोचना ॥४॥ भक्तवत्सला भयनाशका ॥ भवभंजका त्रिपुरारी

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥५॥ नीलकंठा शशिशेखरा ॥ गौरीवरा गणानाथा ॥६॥ महादेवा महाराजा ॥ नंदिध्वजा तुज नमो ॥७॥ हर रे मन्मथाची वाणी ॥ नामस्मरणीं ठेवावी ॥८॥

अभंग १०२ वा

ऐका कथेचें महिमान ॥ भक्तजन भाविक हो ॥१॥ कलियुगीं हेंचि सार ॥ तरले फार या वाटें ॥२॥ कानीं पडतां शिवनाम ॥ वाटे प्रेम शरीरीं ॥३॥ होय पातकाचा नाश ॥ तुटे पाश भवाचा ॥४॥ उपजे श्रवणीं आवडी ॥ जोडे जोड भक्तीची ॥५॥ मन्मथ म्हणे कथामृत ॥ करी तृप्त सकळींका ॥६॥

अभंग १०३ वा

असे शुद्ध भाव ज्याचा ॥ देव अंकीत तयाचा ॥१॥ अहो आठवितां पोटीं ॥ धांवे तयाचे संकटीं ॥ २ ॥ कोठें पडो नेदी उणें ॥ जाणे अंतरींच्या खुणें ॥ ३॥ गुंते भावार्थाच्या लोभा ॥ जेथें पाहे तेथें उभा ॥ ४ ॥ म्हणे मन्मथ शिवलिंग ॥ देव भाविकाचा योग ॥ ५ ॥

अभंग १०४ वा.

जाणोनी न नेणें करी माझें मन ॥ आपली प्रेम खूण देउनीया ॥१॥ मग मी संसारीं असेन व्रतस्थ ॥ जैसें हो जळांत पद्मपत्र ॥२॥ ऐकूनी न ऐके निंदा स्तुती कानीं ॥ जेवीं कां उन्मनीं योगीराज ॥३॥ देखूनी न देखे प्रपंच हा सृष्टीं ॥ स्वमीचिया दृष्टी चेवलीया ॥ ४ ॥ बोलूनी अबोला असावा लौकीक ॥ निर्वाणी निःशंक देहभान ॥५॥ मन्मथ म्हणे ऐसें करी कोणेवेळीं ॥ जेवीं लवण जळीं मिळे तेवीं ॥ ६ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## अभंग १०५ वा.

कैलासीचें ठायीं न वसे वसती ॥ सद्गुरूची संगती होई जेव्हां ॥१॥ साधुसंगें मोक्ष लुटे सर्वकाळ ॥ विश्रांतीचें मूळ साधुजन ॥२॥ धन्य साधुजन साधिती जे नर ॥ भवसिंधू दुस्तर तरती कीं ॥३॥ मन्मथ म्हणे साधु तोचि निजानंद ॥ त्याचें पायीं छंद लागो आम्हां ॥४॥

## अभंग १०६ वा

काय कैलासा करावें ॥ मुखीं शिव नाम घ्यावें ॥ १ ॥ काय कैलासासी काम ॥ मुखीं घ्या रे शिवनाम ॥ २ ॥ अहो शिव-नामापुढें ॥ काय कैलास बापुडें ॥३॥ काय कैलासाची चाड ॥ मन्मथ म्हणे शिव गोड ॥ ४ ॥

## अभंग १०७ वा

भोळ्या शंकरा शंकरा ॥ पार्वतीचिया हो वरा भोळ्या शंकरा ॥१॥ माझी ऐकावी प्रार्थना ॥ बहुत पावलों यातना भोळ्या शंकरा ॥२॥ तोडी संसार बंधन ॥ लावी चरणीं अंतःकरण भोळ्या शंकरा ॥ ३ ॥ आतां नको गर्भवास ॥ फार झालों कासावीस भोळ्या शंकरा ॥ ४ ॥ मन्मथासी सोडवी आतां ॥ विश्वलोचना अनंता भोळ्या शंकरा ॥५॥

## अभंग १०८ वा

वाचें वदा नमःशिवाय ॥ सुलभ उपाय सर्वांशीं ॥१॥ पार्वतीस सर्वेश्वर ॥ हाचि सारबोध केला ॥२॥ मूळमंत्र पंचाक्षर ॥ जपतां पार भवसिंधू ॥३॥ नारीनर सकळीका ॥ नाहीं धोका या मार्गी ॥४॥ वेदशास्त्रें देती ग्वाही ॥ याहून नाहीं साधन ॥ ५ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मन्मथ म्हणे धरा कंठीं ॥ लाभ पोटीं सांठवा ॥६॥

अभंग १०९ वा

गुरू आणि लिंग जंगमाची सेवा ॥ देई मज देवा जन्मोजन्मीं ॥१॥ रुद्राक्षाच्या माळा भस्म लावूं भाळीं ॥ हेंचि चंद्रमौळी देई मज ॥ २ ॥ तीर्थ आणि प्रसाद मंत्र षडाक्षर ॥ ध्याऊं उमावर जन्मोजन्मीं ॥३॥ मन्मथ शिवलिंग म्हणे आवरण ॥ हेंचि अष्टावर्ण वीरशैवां ॥४॥

अभंग ११० वा

तुजलागीं हेंची मागों ॥ तुझें नामीं छंद लागो ॥ १ ॥ सुखें संसारासी घाली ॥ देई आवडी पाऊलीं ॥ २ ॥ नको नीचांचा सहवास ॥ नको साधूजनीं त्रास ॥ ३ ॥ मोह पुत्र कलत्राचा । नको लोभ शरीराचा ॥ ४ ॥ नको एकांतीं लोकांतीं ॥ नको परनारी संगती ॥५॥ म्हणे मन्मथ शिवलिंगा ॥ देई चरणापाशीं जागा ॥६॥

आरती

आरती शिवराजा, मन्मथ स्वामी महाराजा । वेदांतांचे सार मुख्य पेरिलें बीज ॥धृ॥ समाधि महास्थळीं, सर्प व्याघ्रांची जाळी । निर्वैर श्वापदें हो, समदृष्टीनें न्याहाळी ॥१॥ शिवभक्ति लोप झाली, विश्व शिवमय केलें । ग्रंथ हा परम रहस्य, गुह्य प्रगट केलें ॥२॥ अभंगीं निरूपण, अनुभविलें ज्ञान । आनंद शिवदास, सर्वशुभ कल्याण ॥३॥

ॐ नमःशिवाय

मन्मथ स्वामींचे अभंग समाप्त.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# ॥ श्री लिंगेश्वराचें अभंग प्रारंभ ॥

गुरु ध्याई गुरु ध्याई गुरु परतें सार नाहीं १
गुरु सेवेचा संकल्प तेंची माझें पूर्ण तप २
गुरु चरणींची रजधूळी तेंची तीर्थाची आंघोळी ३
केलें सद्गुरूचें भजन तेंची माझें अनुष्ठान ४
लिंगेश्वर सांगे वर्म गुरु तोची परब्रह्म ५

## अभंग २

येई बा शंकरा कृपेच्या सागरा भेट दे दातारा अनाथासी १
अनाथ अपराधी आलों मी शरण कृपा मज पूर्ण करी देवा २
देवा आदिदेवा शंभु सदाशिवा निज पदीं ठेवा देई मज ३
देई मज ज्ञान तुझ्या स्वरुपाचें तेणें अविद्येचें तुटें मूळ ४
तुटतीं बंधनें तुझिया कीर्तनें चुके येणें जाणें नाम घेतां ५
नाम घेतां रूप आठवें सुंदर ध्यायीं लिंगेश्वर वेळोवेळां ६

## अभंग ३

अंतरात्मया कृपाळू स्वामीया यावें करुणालया अंतर्यामीं १
अंतरीं बैसुन सुख द्यावें मज आनंदाची भूज नाचवीन २
नाचवीन मन तुझिया चरणीं गाईन कीर्तनीं नाम तुझें ३
तुझें नाम गाता सुख वाटे चित्ता मुक्ति सायुज्यता नलगे मज ४
नलगे वैभव कनक आणि कांता तुझें नाम घेतां सदाशिवा ५
देवा मज देई नामामृत गोडी ही पूर्ण आवडी लिंगेश्वरा ६

## अभंग ४

तृषाक्रांता जैसी जीवनाची गोडी तैसी तुझी गोडी लागो मज १
भुकेलिया जैसा जेवितो तातडी तैसी तुझी गोडी लागो मज २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तारुण्यी वनिता भ्रतारा आवडी तैसी तुझी गोडी लागो मज ३
लिंगेश्वर म्हणे नामाचा बराडी प्रेम प्रीति आवडी पुरवी देवा ४

अभंग ५

चौऱ्याऐंशी लक्ष भ्रमें फिरलासी शेवटीं आलासी मनुष्य जन्मीं १
सांडोनी भजन विषय स्मरसी तेणें तूं पावसी जन्मदुःख २
सोय धरी अतां अरे जडमूढा काळाचीया दाढां पडशील ३
पडशील कैसा ऐकरे गव्हारा मुषक मांजारा सांपडला ४
सांपडला जैसा जंबुक सिंहासी पारधी पाडसा धरूनि आणी ५
धरिला वृषभ व्याघ्रें जैसा मुखीं तैसें तुज शेखीं होईल जाण ६
लिंगेश्वर म्हणे धरा शिवसोय मग नाहीं भय कळी काळाचें ७

अभंग ६

देहीं घरामाजीं दाटलें बहु कर्म प्रपंच आश्रम नांदतसे १
स्त्रिया चौघीजणी कलकला करिती मत्सरें भांडती नानापरी २
कन्या सातजणी स्वार्थाचें लक्षणीं आपुलाले गुणीं पडतसे ३
पुत्र तेरा जण करिती अवगुण विषयाला गुण धांवताती ४
ऐशा आश्रमाचा लागलासे घोर तैं वेळीं विचार आठवला ५
उबगोनी शरण गेलों सद्गुरुसी तेणें कुटुंबासी निवारिलें ६
लिंगेश्वर म्हणे आपणां ऐसें केलें बैसविलें निजपदीं अढळ ७

अभंग ७

पांच गेले पांचा ठायां कैसा देह गेला विलया १
मृत्यु पावला तो कोण तें मज देई बा सांगून २
देह आत्मा काय मेला सांगा विचार कैसा झाला ३
विश्व पहातां अवघे मुक्त परी कल्पना बाधीत ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

लिंगेश्वर विनवी मना वेगीं सोडी तूं कल्पना ५

अभंग ८

रुईच्या फळामाजीं कोठून असे रस पहातां कापूस अभ्यंतरीं १
तैसा निंदकाचा व्यर्थ जन्म जाय कल्पांतीं उपाय नाहीं तया २
शेवरीचा वृक्ष सर्वांगीं पोकळ वरीं पुष्प फळ नास्ति जैसें ३
पांगाऱ्याचीं फुलें सुरंग तेजाळ सांडील परिमळ थोरवी कोणा ४
सांडण्याचें अन्न जरी झालें मिष्ठ सज्जन श्रेष्ठ नातळती ५
लिंगेश्वर म्हणे जो पडे भोंवरी तो केंवीं माघारीं येई तीरा ६

अभंग ९

कोणी एक मेंडका असत संसारीं मन श्वानावरी असे त्याचें १
त्यासी अंतःकाळ आला एका वेळीं पहातां जवळी कोणीं नसे २
रात्रंदिवस माझ्या जीवाचा सांगाती तो जिवलग अंतीं आठवला ३
श्वान श्वान म्हणतां शिवशब्द आले सहज घडलें भजन त्यासी ४
रुद्रगणा-हातीं विमान आणिलें कैलासासी नेलें घालूनीया ५
लिंगेश्वर म्हणे काय वाणूं त्यासी मेंडका कैलासीं राज्य करी ६

अभंग १०

सांडोनियां जन वसविलें वन दावावया चिन्ह वैराग्याचें १
वैराग्य वितंड प्रबोधीं प्रचंड स्वरूप अखंड उद्धरिसी २
उपदेशिले जन कृपा केली पूर्ण पतित पावन शिवराज ३
शिवराज सद्गुरु मुखें उच्चारितां तुटली भ्रमता चौऱ्यांशीची ४
चौऱ्यांशीचा फेरा चुके सद्गुरूनामें म्हणोनी मनोधर्में शिवस्मरा ५
स्मरा शिवलिंग धरा साधुसंग लिंग या अभंग गुरु-चरणीं ६

अभंग ११

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

जास्वंदाचें पुष्प होतें शिवांगणीं घारीनें नयनीं देखियलें १
आमिष म्हणोनी मुखीं धरियलें झडपोनी नेलें नभा माजीं २
झडपी सरीसें आंगण लोटिलें मन संतोषलें शंकराचें ३
हस्तावीण कैसें आंगण लोटिलें विमान धाडिलें घारीलागीं ४
लिंगेश्वर म्हणे न कळे याची थोरी घारीला शिवपुरी प्राप्त झाली ५

## अभंग १२

ऐसा कोण आहे देव नाम घेतां नुरे भव १
एका शंकरा वांचुनी कोण आहे मोक्षदानी २
न पाहेची भाव शुद्ध तोडी पतिताचें बंध ३
महा पातकी तारीले नारी नर उद्धरिलें ४
लिंगयासी आणिली शोभा केला कैवल्याचा गाभा ५

## अभंग १३

पटकर पोतेरें करी सुगरण तैसा जन्म जाण व्यर्थ गेला १
काष्टपरी जैसा जाळिला चंदन तैसा जन्म जाण व्यर्थ गेला २
कवडीचें मोलें दिधलेसें रत्न तैसा जन्म जाण व्यर्थ गेला ३
लिंगेश्वर म्हणे न करी भजन त्याचा जन्म जाण व्यर्थ गेला ४

## अभंग १४

उदयालागीं कैसा आला तये काळीं तस्कर देऊळीं प्रवेशला १
माथां ठेउनी पाय चांदवा सोडिला शिव संतोषला मनामाजीं २
म्हणे माझे भक्त उदंड हे उर्वी देह कोणी पूर्वी न अर्पिला ३
महा भक्त म्हणोनी कैलासीं नेला निजपदीं स्थापिला सदाशिवें ४
लिंगेश्वर म्हणे न कळे याची महिमा चोरटा निजधामा पावलासे ५

## अभंग १५

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कोणी एक अभागी कुष्टकुश्चळ अंगीं शिवद्वारीं रोगी पडिला असें
दुर्गंधासी त्यांच्या जाणोनिया श्वान करू आलें चाटन तया प्रती
हड हड म्हणतां हर हर बोले तेणें संतोषले शूळपाणी
एवढ्या दुःखांत घेतो माझें नाम म्हणोनि निजधाम अर्पी त्यासी
दिव्य देह करूनी कैलासीं नेला निजपदीं स्थापिला सदाशिवें
लिंगेश्वर म्हणे न कळे याची लीला सुखाचा सोहळा रोगी भोगी

## अभंग १६

भोळा चक्रवती कोणें म्हणविलें नाम पडियलें शिवराय १
शंकरा सारीखा कोण देव आहे विचारूनी पाहे त्रिभुवनीं २
कोणीं अग्नीनेत्रें मदन जाळिला कोणीं संहारीला त्रिपूर दैत्य ३
कोणीं ब्रम्हायाचें ज्येष्ठ मुख छेदिलें कोणी म्हणविलें पूर्ण योगी ४
कोणीं वरदान असुरा दिधलें कोणीं राज्यीं स्थापिलें राक्षसासीं ५
कोणीं राज्यसंपत्ती वहन अर्पिलें कोणीं दान केलें स्वस्त्रियेचें ६
कोणीं विषालागीं दिधलेसे पाठीं धरियलें कंठीं भक्तकाजा ७
लिंगेश्वर म्हणे विचारुनी पहातां शंकरा परता आणिक नाहीं ८

## अभंग १७

चहूं युगामाजीं कलियुग बोलिजे क्षीराब्धी साजे समुद्रास १
याही परतें सार आणिक नाहीं थोर शास्त्रीं हा निर्धार केला असे २
सकळ सरिता असती अनेगा पवित्र ते गंगा पुण्यशीळ ३
सप्त द्विपामाजीं जंबुद्वीप सार पतिव्रता थोर उमादेवी ४
हस्तींमाजीं शोभें रत्न ऐरावती धेनु जे बोलती काम-धेनु ५
वृक्षा माजीं एक शोभे कल्पतरू पर्वतात मेरु थोर असे ६
वृषभा माझारीं नंदी हा उत्तम जन्मामाजीं जन्म मनुष्य देह ७

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सर्व देवामाजी समर्थ शंकर ध्याय लिंगेश्वर वेळोवेळां ८

## अभंग १८

एक वेळां मिळे दूध तूप मांडा एक वेळां कोंडा ताका सर्वें १
अवघेची दिवस सारिखे नाहींत करावें स्वहित शिव नामीं २
एक वेळां मिळे मंचकीं शयन एक वेळां तृण अंथरावया ३
एक वेळां मिळे अश्व हस्ती वृषभ एक वेळां रासभ प्राप्त होय ४
एक वेळां वस्त्र अलंकार एक वेळ झांजर वाकळ ती ५
एक वेळां जगीं जोडला सन्मान एक वेळां अपमान होत असे ६
लिंगेश्वर म्हणे सांडा सुख दुःख भजा पंचमुख दृढ भावें ७

## अभंग १९

दळण दळितां स्त्रियांचिये स्थिती तोंडें बरळती भलतेंची १
शंकरा सांडोनी पितयासी गाती सत्य त्या म्हणती अमंगळा २
चिमुकल्या कारणें वर्णिती जननी शिव न ये वदनीं धांगडीच्या ३
आपुल्या स्वार्थासीं वर्णिती बंधुला शिव स्मरणाला आठवेना ४
बहीण चुलती कुळ गोत्र सकळां गातातीं खटाळा नानापरी ५
लिंगेश्वर म्हणे किती सांगू रांडेस दळिता शिवास आठवीना ६

## अभंग २०

तारु बांधोनिया पैलतीरा जाती सांगड फोडीती काम झाल्या १
ऐसें जे चांडाळ गुण विसरती सहज पडती नरककुंडीं २
नांवेचें सांगातें उतरले नदी नांव अग्नीमधीं जाळितातीं ३
गायत्रीचें क्षीर घेतलें पिळोनी उपवासी बांधोनी ताडितातीं ४
नऊ मास उदरीं वागवी सुंदरी ते माता चौ बारीं नग्न केली ५
फळें भक्षोनियां तोडी कल्पवृक्ष गंगाजळ प्रत्यक्ष घेवोनी निंदी ६

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अष्टोत्तर संख्या रोगाच्या काढोनी तो वैद्य मारोनी दवडीला ७
दुष्काळीं वाचला सुकाळीं माजला शेखीं मारून गेला द्रव्य नेलें ८
सुपंथें पावला आत्म--नगरासी गेलीया पंथासी निखंदीजे ९
दोराच्या आधारें पर्वत चढला पावला साठीं केला अपघात १०
लिंगेश्वर म्हणे धरा संत संग नको संसर्ग अभक्ताचा ११

अभंग २१

फाकट फुकट बोलती फोलकट बोधितां बळे कट धरिती गा १
खोटी वटवट कोरडी चावट व्यर्थ कटकट करिती गा २
कल्पना कळकट त्रिगुण चोखट माया मळकट करिती गा ३
निर्गुणीं निघोट वस्तु ते घनवट नेणोनी हूलुवट मारिती गा ४
लिंगेश्वर निकट गुरु कृपें निष्ठ येर भेद भ्रष्ट हरती गा ५

अभंग २२

काम सर्पें मज अवचीत डंशीलें तें विष चढलें ब्रम्हांडासी १
मन भांबवलें शुद्धि नसे कांहीं आप पर तेंही आठवेना २
पाया पिळ पडे हातही भागले बहु दुःख झालें तये वेळीं ३
कुकर्मांचा झेंडू अंतरीं लोटला कंठीं जो दाटला वासनेनें ४
प्रपंच कडुलिंब मज गोड वाटें रुतती विषय कांटें म्हणोनीया ५
तया वेळीं थोर दुःख वाटें जीवा भावें केला धांवा सद्गुरुचा ६
आला झाडकरी गुरु धन्वंतरी सोहं बीजें मंत्रीं झेंडू फोडी ७
वीष उतरोनी देहशुद्धी केली मूर्छना हरली इंद्रियाची ८
प्रपंच कडूलिंब सहज वाटला- सावध हो ठेला परब्रम्हीं ९
कडू वनौषधीं मधुरता आली तैसी परी झाली लिंगेश्वरा १०

अभंग २३

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सर्व साधनाचें सार सर्व व्रतासी आधार
सकळ तीर्थांचें माहेर कपिलधार अघ--नाशी १
सर्व सिद्ध ऋषिमुनी अनेक तापसांच्या श्रेणी
गिरिजा सहित शूळपाणी वसे या स्थानीं सर्वदा २
इंद्र विरंची सुरनर जो का लक्ष्मीचावर
आवडा बसती निरंतर कपिलाधार अनुपम्य ३
कपिलाधार वाराणसी कपिलाधार पुण्य राशी
कपिलधार सर्व जीवांसी सुखदायक अक्षयीं ४
कपिलाधार भू-कैलास कपिलाधार तोडी पाश
कपिलधार जड जीवास भवमोचन भवभीता ५
लिंगेश्वर म्हणे यारे सांडून साधन पसारे
अवघे जीवन्मुक्त व्हारे कपिलधारीं न्हावोनी ६

## अभंग २४

सावध होई सावध होई आपणा आपण लक्षुनि राही १
अंतर वोवरीं सुखें क्रीडा करी इंद्रियद्वारां नको येऊं बाहेरी २
तद्रुप तन्मय झाली अखंडता वृत्ती विराली अवधी वस्तुता ३
मुक्ति मायीक मोक्ष कल्पनीका निर्विकल्प देहीं तोचि स्वयें मुका ४
लिंगेश्वर म्हणे सांगेन तो कोश तूंची परब्रम्ह परतोनी असे ५

## अभंग २५

स्वामिसी चुकलें कपड्याचें श्वान तैसें झालें जिणें निगुऱ्याचें १
दहीं क्षिरीं मार्जी चाट्ट हिंडे मानें तैसें झालें जिणें निगुऱ्याचें २
गणिकेचा पुत्र पितयासी नेणें तैसें झालें जिणें निगुऱ्याचें ३
लिंगेश्वर म्हणे जो सद्गुरुसी नेणे अजा-गळीं स्तनें तैसा जन्म ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अभंग २६

सद्गुरु सज्जन माय शिष्य बाळा टाळी भय १
ओसंगळां घेवोनियां प्रेम पान्हा पाजूनिया २
बोधीं पोटीं प्रेम लहरी स्वानुभवें सुखी करी ३
अद्वय शोभे अलंकार विवेक अंगीं टोपी सार ४
कृपादृष्टीं अवलोकी बैसविलें विजय अंकीं ५
मुक्तपणें रांगे खेळे परतोनी चरणीं लोळें ६
अज्ञान लिंगेश्वर बाळ बोलूं नेणें वाचा बरळ ७

अभंग २७

ॐ नमो सद्गुरु शिव परब्रम्हा स्वामी सर्वोत्तम परात्परा १
परातीत परा निज निर्विकारा वंदू सर्वेश्वरा गुरु देवा २
देवाधिदेवा नित्यानंद शिवा शुद्ध स्वानुभवा निजरूपा ३
रूप नामातीता अद्वय अवधूता निर्भय निर्धूता निरंजना ४
लिंगेश्वर म्हणे अलक्ष अमूपा नित्य निर्विकल्पा अजा अक्षरा ५

अभंग २८

जाणा पशु पक्षी श्वापदें जळचरें ओघ नदी क्षेत्र ब्रम्हरूप १
ब्रम्हरूप असे पिपिली मशक अन्न धात कीटक ब्रम्ह तेंचि २
तेंचि इष्ट मित्र गोत्र पिता पुत्र सखा शत्रु सर्व ब्रम्ह भासे ३
लिंगेश्वर रूप द्रव्य - दारादिक स्वामीही सेवक ब्रम्ह देखा ४

अभंग २९

ब्रम्हत्व वर्तती इंद्रिय-दशक विषय पंचक प्राणांसहित १
हिताहित मात सद्गुरु सांगतां गुरु शिष्य समस्ता ब्रम्हानंद २
ब्रम्हीं ब्रम्हानंद आनंदी आनंद स्वानंदी निजबोध सहजची ३

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सहजानंद बोध सहजची लाधला सहज होऊनी ठेला सहजाकार ४
सहज सहजाकार ब्रम्ह ठसावलें सहजी साठवले सहजामाजीं ५
सहजामाजीं असें आशनें न साहे न साहोनी राहे ऐसें ब्रम्ह ६
ऐसें ब्रम्हरूप केलें सद्गुरुनें मान्य आणि बोलणें राहीलें जेथें ७
जेथें सुख दुःखातीत सुखसारा तेंची निर्धारा अनुपम्य ८
लिंगेश्वर म्हणे अवघा वस्तुभाव शिष्या आडनांव तेंहीतेंची ९

## अभंग ३०

नाहीं तो प्रकाश दीपाशीं वेगळा तैसे चंद्रकळा मिरवतसे १
मिरवतसे कीळ रत्नीं परीमळ उष्णता अनळ एकरूप २
रूप तेची इच्छा ब्रम्हीं तेवी माया मिथ्या असोनिया जाणतसे ३
जाणिजे तें तत्व सुमनीं सुवास जळीं जळ रस तैसा असे ४
असें समिरण पवनीं पवन तंतुपटपग ऐक्य दिसे ५
दिसे अलंकार सर्व सोनियाचे तयाचें तद्रुप कारण तें ६
कारण कनक कार्य झाल्या नग कुकडी गेटा नथ परोपरी ७
परोपरी मुद्रा शोभती पवित्र कंठी गळसुत्र भूषणची ८
भूषण बहुविध परि सर्व हेम तैसें जग ब्रम्ह सत्य जाण ९
लिंगेश्वर म्हणे जळ आणि तरंग तैसें ब्रम्हीं जग ऐक्य असे १०

## अभंग ३१

क्षर क्षरातात उत्तम पुरुष परमात्मा परेश नित्यानंद १
नित्य शुद्ध बुद्ध नित्य मुक्तमानी आदि मध्य अवसानीं तोचि एक २
एकाचे अनेक अनेकाचे एक नवल कौतुक अभिनव ३
अभिनव कैसें स्वरूप जयाचें कोण जाणे तयाचें महिमान ४
महिमा अपार नेणवे वेदासी शास्त्र पुराणासीं न कळेची ५

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नकळे म्हणोनी श्रुति नेती नेति पराादि मुरडती चारी वाचा ६
लिंगेश्वर म्हणे स्वरूपीं निर्धार विवेक विचार हरपला ७

अभंग ३२

बोली बोलवेना मना जाणवेना अलक्ष लक्षेना चर्मदृष्टी १
दृष्टीसी अतीत असोनी लपत लपोनी जाणत सकळांसी २
सकळीं सकळ होऊनी निखळ अमूळाचें मूळ तुळान्वय ३
अन्वय पहातां मुख्य अधिष्ठानीं दुजा नाहीं कोणी दावावया ४
दावावया जोगें कोठेंची हें नसें नाहीं म्हणतां भासे अवघेची ५
लिंगेश्वर म्हणे शिवमय जग ऐसें परम भाग्य भावनेचें ६

अभंग ३३

भावना भावितां आपणची ब्रह्म स्वानुभव वर्म ठसावलें १
ठसावलें ठायीं देहीं देव पाही लक्षुनियां राही तुझा तूंची २
तूंची ब्रह्मरूप होसी विश्वाकार महा-वाक्य विचार निर्धारतो ३
निर्धारतो आत्मा आमुचा होईल ज्ञान प्रकाशेल स्वतः सिद्ध ४
स्वतः सिद्ध ब्रम्ह असतां आपण नेणें मूढ जन अविचारें ५
लिंगेश्वर म्हणे दुरी दुरावला राज्यत्वा मुकला राजा जैसा ६

अभंग ३४

भावना विपरीत सुपरीत करावी वृत्तिही धरावी शुद्धसत्वीं १
शुद्धसत्वात्मक तरीच साधेल एकाग्र होईल चित्तवृत्ती २
वृत्तीही विराली समत्वें समान घटीं मठीं गगन तदाकारें ३
तदाकार आत्मा अवघाची असे तोची तो प्रकाशे सर्वांठायीं ४
सर्वा ठायीं तया असोन नसणें आत्माआत्म लक्षण सर्व गत ५
सर्व गत वस्तु सर्वत्रीं संचला सर्व तोची झाला सांग आतां ६

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

लिंगेश्वर म्हणे अशी अवचित वृत्ती आनंदीत असो द्यावी ७

अभंग ३५

आतां मी सांगेन महा द्वैत मत जेथें द्वैत अद्वैत ऐक्य होय १
ऐक्य दिसे ब्रम्हीं प्रपंच समस्त बोली वेदांत स्वतः सिद्ध २
स्वतः सिद्ध बोले पूर्वपक्षावीण उत्तर पक्षीं जाण निरसीता ३
निरसी उभयतां भेदाभेद वार्ता महा वाक्य तत्वतां सिद्धांतगा ४
सिद्धांत सांगणें जग ब्रह्म एक येक न अनेक ऐसे होय ५
लिंगेश्वर म्हणे निर्धारी असतां किरण सविता भिन्न नाहीं ६

अभंग ३६

जसी सिंधु आपणा सरीता ह्मणवी पुरंदर कवी म्हणवितो १
म्हणवी कल्पतरू शेवरीचा वृक्ष तैसा आत्मा प्रत्यक्ष जीव भावी २
मृगजळ भास देखती हे जन परी नव्हे जळ किरणें खरीं ३
खरे कीरणज्वाळा त्यासी ह्मणती जळ अज्ञान केवळ अंधमृग ४
अंधमृगा ऐसें जाणें मतिमंद पूर्ण चिदानंद नकळेची ५
नकळे सांग ब्रम्ह तोची शतमूर्ख व्यर्थ तर्कातर्क वाढविती ६
वाढविती भेद नेणोनियां वर्म सकळ हें ब्रम्ह न कळें त्यासी ७
त्यासी कळावया उपाय असती संत त्या म्हणतीं महा-वाक्य ८
महा-वाक्य लक्षीं मूळ दृष्टी घाली सकळ न्याहाळी ॐकार वृक्षा ९
वृक्षा बुडीं राहे ऊर्ध्व दृष्टीं पाहें खोड खांदीया होय एकरूप १०
लिंगेश्वर म्हणे पत्रीं पुष्पीं फळीं पहातां समुळीं अवघा वृक्ष ११

अभंग ३७

वृक्ष परब्रम्ह चिद्रूप सबळ प्रपंच हें फळ सत्ता देंठ १
देंठ फळ वृक्ष एकची आकृती बहदारण्या ऋषि श्रुति बोले २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बोलती सद्गुरु अवघा ब्रम्ह तरु मायादि संसारु एकरूप ३
लिंगेश्वर म्हणे ब्रम्हरूप तितुकें सांगेन निष्टंके प्रथगाकारें ४

अभंग ३८

प्रथगाकार ब्रम्ह विष्णु महा-रुद्र अग्नि सूर्य चंद्र ब्रम्ह असे १
असे शिवगण ऋषी मुनी गंधर्व इंद्रादिक देव ब्रम्ह जाणा २
जाणा थळ जळ नळा कळी नळ खग रूप मंडळ ब्रम्ह जाणा ३
सत्य जाणा तुम्हीं नरनारी समस्त दैवत भूत प्रेत ब्रम्ह असे ४
लिंगेश्वर म्हणे पर्वत पाषाण गुल्मलत्ता तृण ब्रम्ह जाणा ५

अभंग ३९

हरपलें मन इंद्रिया - सहित हरपलें चित्त बुद्धीं नाहीं १
नाहीं अंतःकरण निर्विकल्प जाण वस्तू परिपूर्ण तेंचि असें २
असे वसे ठसे पूर्णत्वें प्रकाशें गुरु कृपा लेशें प्राप्ती होय ३
होय ब्रम्हरूप सर्वत्रीं सर्वदा महाद्वैत बोधा लाधलीया ४
लिंगेश्वर म्हणे ब्रम्ह सनातन महावाक्य जाण उपदेश ५

अभंग ४०

उपदेश करिती स्वामी शिवलिंग सद्गुरु भुजंग परात्पर १
परंपरते पर निरोंपिलें सार वस्तु निराकार निरामय २
निरामय केलें द्वैत निरसीलें अद्वैत दाविलें कृपाळूत्वें ३
कृपा करोनिया भेदासा खंडिलें अभेद दाविले द्वंद्व - दृष्टी ४
लिंगेश्वर म्हणे सद्गुरुच्या बोधे भेदा-भेद द्वंद्व निरासियला ५

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते
पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते
ॐ शांतिः शांतिः शांतिः

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

श्री लिंगेश्वराचे अभंग समाप्त

## ॥ श्री बसवलिंगाचे अभंग प्रारंभ ॥

गुरु-वाक्य धरा ध्यानीं अवधी सांडावी चाळणीं १
सदगुरूचा उपकार त्यानें दाविलें आपपर २
ज्याला शोधित गेले दुरी तें दाविलें मज माझारीं ३
गुरु-वांचुनी आहे कोणी दुजा नाहीं त्रिभुवनीं ४
बसवलिंग वाट उघडी पाहूं अमृताची गोडी ५

### अभंग २

आकार मिथ्या वोडंबर नासून जाय चराचर १
दिसें तितुकें नासून जाय न दिसें तितकेंच आहे २
पंच तत्वें न राहातीं इतरांची कैसी गती ३
रवी शशी रत्नें दोन्हीं तेही जाती निरंजनी ४
बसलिंग बोले खूण श्रोतीं घ्यावें ओळखून ५

### अभंग ३

मरण कवणासी न चुकें न राहतीं ब्रम्हादिकें १
साही गेले चक्रावर्ती अवतार ही न राहाती २
मोठे मोठे अनुष्ठानीं तेही न राहती कोणी ३
गुरु-कृपा जयावरी जन्म मरणासी निवारी ४
बसवलिंग गुज गाय धरा अजुन बरवी सोय ५

### अभंग ४

शिव जिवासी उध्दरी दुजा नाहीं अधिकारी १
जिव शिवाचा एकला म्हणूनी अंगीकार केला २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

घटाप्रती अधिष्ठान घट भंगता अभिन्न ३
काष्ट अग्नीसंगे जळे ज्वाळा तेजामाजीं मिळे ४
ज्याचें बाळ त्यासी माया इतर बोलणें ते वाया ५
बसवलिंगासी तो तारू शिवभक्तासी आधारू ६

अभंग ५

शिव झाला गेला नाहीं तो जेथें तेथें पाही १
जीव शिव झाला कैसा उदकीं सूर्य बिंबे तैसा २
वायू व्यापूनी अलिप्त तैसा शिव परम तत्त्व ३
जैसें व्यापक गगन तैसा शिव परिपूर्ण ४
उपमा द्यावया ऐसें शिव रूप होत नसे ५
बसवलिंग म्हणे शिव जाणें गुरू एकभाव ६

अभंग ६

आदी नमो आदी गण चौदा विद्याचें भुवन १
आधार चक्राची मांडणीं तेथें नांदे कुंडलणीं २
आधार लिंगातळीं असें चारी पाकळीका वसे ३
पृथ्वी पूर्व मुखीं दिसे गंध हंकार प्रकाशे ४
गण दैवत एके पाती कुंडलणी सरस्वती ५
वर्ण रक्त सहा शत तळीं आपान नांदत ६
नाभीं असे मुख्य प्राण परी तयाचें हृदयीं स्थान ७
अधारी पाव घटीका जाण सवाघटी प्राणायाम ८
सूर्य देखणें अंधारी लक्ष त्रिकुटी माझारीं ९
तेथून अजपाचा डाव चित्तीं धरा शुद्ध भाव १०
बसवलिंग म्हणें बापा अजप मंत्र आहे सोपा ११

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

### अभंग ७

मंगळमूर्ती मोरेश्वरा चौदा विद्येच्या दातारा १
शट् चक्र भेदूनि जासी बावन किल्लया ओळखसीं २
आधार लिंग नाभी प्रगटी हृदयीं मुळें लल्लाटीं ३
पन्नास नेमल्या त्रिकुटीं दोन राहिल्या श्रीहाटीं ४
बारा सोळाची मिळणी भेटे सत्रावी जननी ५
बसवलिंग औट मात्रा परम रस वोपी वक्त्रा ६

### अभंग ८

देह देऊळ शिरोमणी नवा खणाची आखणी १
पाच पंचवीस त्रिगुणी मन पवनाची मिळवणी २
चिरे जडले तीनशें साठ बंध तितुके बळकट ३
चौदा चक्राची मांडणी सोळा सांध्याची जोडणी ४
बहात्तर कोठडी निराळे नऊ दरवाजे मोकळे ५
बावन हात उंच देऊळ बारा सोळा जोती प्रबळ ६
अवघड उन्मनीची पेठ शट् चक्रावरूनी वाट ७
त्रिकूट सांडून औटपीठ भ्रमर गुंफा चढा नीट ८
तया परतें परात्पर लिंगवर्ण तो आकार ९
ऐसा आहे महालिंग पाहा म्हणे बसवलिंग १०

### अभंग ९

जीव शिवाचा असूनी कदा वदेना वदनीं १
देवीं देव पूजीताहे शिव वाचेसी तो नये २
लागे पाखंडाचे मार्गे गोड वाटे नटीं सोंगे ३
अन्न भक्षितो शिवाचें नांव घेतो आणिकाचें ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कधी वाचे न ये शिव तो पावे रव रव ५
बसवलिंगाचें वदनीं शिव शिव वदे वाणी ६

अभंग १०

लिंगस्थानीं ब्रह्म देवा नमो गावें त्या अनुभवा १
स्वाधिष्ठानीं साडे सात घटका घालूनी गणित २
ब्रह्मा प्रकाशला थोर जप केला सहा हजार ३
सावित्री सुषुम्ना आपण व्यानागीचें सन्निधान ४
प्राणा वानासी भेटून वर्ण श्वेत पीत जाण ५
बसवलिंग म्हणे पाही बाल मध्वरी रीग नाहीं ६

अभंग ११

ज्याचें संचीत त्या सांगात कोण जाणें पूर्व दत्त १
जेव्हां गर्भी रचिला गोळा बरें वाईट तये वेळां २
जैसे घेणें तैसे देणें उणें अधिक नाहीं जाणें ३
हेतू बीज संसारासी थोर नाडले सायासी ४
एक राव दुजा रंक याचा न करिजे शोक ५
बसवलिंग म्हणे न ठेवी आशा मनशा घर बुडवी ६

अभंग १२

सत्य तोची धर्म होय असत्य हेंच कर्म आहे १
सत्य धराहो जीवासी लाथ मारा असत्यासी २
सत्य सावित्रीचें घरीं असत्यासी यमपुरी ३
सत्य बेचाळीस उद्धरी असत्यें चौऱ्यांशीची फेरी ४
सत्य देवाजीचा गडी असत्यासी तो रगडी ५
बसवलिंग म्हणे घाई सत्य सोडूं नका भाई ६

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri
3522

## अभंग १३

अष्ट दळाचा जो सज्जा तेथें प्राण असे माझा १
डपावरी अष्ट दळ अधोमुख अविद्या मळ २
जीव नांदतसे प्रबल ईश्वर ज्योतीच केवळ ३
विश्व प्रतिबींब नव्हे तरी साकार स्वभावे ४
तैसें जीवा ओळखावे प्रवृत्ति सगुणा जाणावे ५
शब्द स्पर्श रूप रस गंध पांचवा प्रकाश ६
श्वेत पीत कृष्ण रक्त तेथें प्राण वसे सक्त ७
जीव ईश्वरीं अंकिला भेद प्रकार नाहीं त्याला ८
चहूं वेदां नाहीं कळला सहस्र-मुखा शेष शिणला ९
आधारीची परा शिणली मनपुरीती पांगुळली १०
अनुहात वेडावले कंठीं वैखरी केवीं बोले ११
बसवलिंग म्हणे सुणे त्या वांचुनी वेद पुराणे १२

## अभंग १४

सत्पुरुषाचीं चिन्हें सांगितली शास्त्रीं कैसीं त्याची परी पाहूं आतां १
होणारा सारखी आठविली बुद्धी काय कृपानिधी करील पाहो २
काय मज हातीं करवील संसार किंवा सारासार वैराग्याचा ३
बसवलिंग म्हणे कांहीं न कळे मज करील शिवराज तेंचि खरें ४

## अभंग १५

आपुला निश्चय मनाचा हा झाला परतोनी आला ऐसा नाहीं १
भोगियलो आम्ही संसारीचा भोग आतां वाटे त्याग करावाहो २
अग्नीचें तें सुख मानी जैसी सती पुढें मोक्षगती भ्रतारासी ३
बसवलिंग म्हणे तैसेंची करावें आतां काय पहावें मागें पुढें ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## अभंग १६

करीन अट्टाहास आपुल्या जीवाचा पाहीन देवाचा महिमा आतां १
टळटळीत ज्ञान कळे मज पूर्ण आत्मत्वें निपुण चित्त होय २
गुरु पुत्र म्हणे गुरुगम्य नेणें तेचि लाजिरवाणें जनामध्यें ३
क्षत्रियाचा पुत्र पळूंलागे रणीं मग तो काय जनीं बरवा दिसे ४
राजपुत्र राज्य सांडूनिया भिक्षा मागितली दीक्षा बरवी नसे ५
सभाग्याचें पोटीं जन्मला करंटा काय जनीं मोठा जाणीजे तो ६
बसवलिंग म्हणे तैसी आम्हां लाज सत्पुरुषाचें बीज कैसें आम्हीं ७

## अभंग १७

देवें माझा जन्म सुखाचा पै केला पोटीं जन्म दिला साधुचीया १
बाळपणीं दिक्षा लाधली गुरुची संसाराची रुची न कळे मज २
स्मरण भजन पूजन संताचें सदा कीर्तनाची प्रेम गोडी ३
नाहीं जाऊं दिलें अन्य ठायीं चित्त धन्य गोत वित्त देव झाला ४
सर्व सुख मज दावीं आपुलें ठायीं बसवलिंगा पायीं स्थीर केलें ५

## अभंग १८

ऐसियासी माझें नमन गुरुमार्गीं अवघे जन १
गोपिचंद गुरुच्या बोला राज्य सांडून जोगी झाला २
गोरक्षांनीं मच्छेन्द्राला मायेपासून सोडविला ३
राम पाताळासी नेला तेथें हनुमंत पातला ४
शुक्राचार्यां मृत्यु झाला पुन्हां कैसा उठविला ५
गुरु कृपा ज्याचें ठायीं बसवलिंग त्याचे पायीं ६

## अभंग १९

भावार्थ तो ऐसा पाहिजे बहु गोड जसा इक्षु दंड चवी न सोडी १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तोडिता मोडिता सोलीता पिळिता अग्नीनें जाळीतां चवि न सोडी २
पाक झाल्यावरी तुडविती चरणें अंती साखर होणें चवी न सोडी ३
बसवलिंग म्हणे धन्य त्याची निष्ठा साहून नाना कष्टा सुखवी जना ४

### अभंग २०

निज ज्ञानी उन्मत्त झाला जन ह्मणती मन्मथ त्याला १
याची लार्गा मन्मथ नाम धरी रूप क्रीडा राम २
रिपु मन्मथ जिंकून देहीं विचरे मन्मथ विदेही ३
बसवलिंग म्हणे काज भवध्यासें होई सहज ४

### अभंग २१

देव आपणा जवळीं आहे अवतारासी करी काय १
कार्या कारण अवतार होय कार्य होता स्थळां जाय २
ज्यांचा अंमल उठिला पाही त्यांचीं न चले कदां द्वाही ३
करितां यात्रा तिर्थाटन तेथें जळ आणि पाषाण ४
पूजा पदार्थांचा भोगी आहे आत्मलिंग योगी ५
बसवलिंग म्हणे शेखीं आत्मलिंगासी ओळखी ६

### अभंग २२

रुद्र अनुहताचा राजा त्यासी स्मरा भावें वोजा १
अष्टदळावरी अनुहात बारा पाकळ्या शोभत २
पंधरा घटीका राहत तेथें प्राणी तेवी भ्रांत ३
सहा हजार होता जप दशनाद आपोआप ४
चित्तीं आणि तेज रूप तेथें सर्व जाय ताप ५
रुद्र दैवत तेथींचें आहार मुख तें तेजाचें ६
कान आकाशीं लाऊनी खेळतसे मन पवनीं ७

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बसवलिंग म्हणे नीट अनुहतावरी कट ८

## अभंग २३

धन्य त्याचा जन्म शिवभक्ताचें कुळीं जेथें चंद्रमौळी वास करी १
संसाराचा बंध तयाचा तुटला पूर्णत्वासी आला म्हणूनिया २
चालतांना मार्गीं उडे जेथें माती ब्रह्मादि वांछिती स्नान तेथें ३
इतराचा पाड कायसा उगेला विष्णु हा निमाला ध्यानीं त्याच्या ४
बसवलिंग म्हणे ऐसियाची सेवा देई मज देवा जन्मोजन्मीं ५

## अभंग २४

मरणा भेणें भीती जीव आम्हां मरण्याचा उत्सव १
कधीं मरूं कधीं मरूं कधीं देहाते विसरूं २
हेंची आमचें चिंतन मागूं सांबा पाशीं दान ३
बसवलिंग म्हणे मरा ऐशा मरणें चुके फेरा ४

## अभंग २५

काय तैसा भाव कुसंब्याचा रंग बेगडाचे नग चार दिवस १
अग्नी जवळी लाख नेतां होय पाणी काढितां तेथूनी दगड जैसा २
ऐसें हें ऐकतां चित्तीं धरी ताठा तो भाव गोमटा नसरे येथें ३
बसवलिंग म्हणे अंतरीं विक्षेप वरी मायबाप म्हणोनी काय ४

## अभंग २६

दिधलें तें घेत नाहीं मागितल्या देत नाहीं १
तीर्थ तपाचे डोंगर फळ प्राप्ती परी अघोर २
खोटें नाहीं खरें कैचें काय साधितां तयाचे ३
आतां श्रम नका करूं जमा होतो फार केरू ४
आप आपणाते पाहे कोठें कोण कैसा आहे ५

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बसवलिंग म्हणे माय गुरु कृपा थोर आहे ६

## अभंग २७

जीव शिवा वेगळा नाहीं कारे भुलसी नरदेहीं १
आकाश व्यापिला पसारा वायू त्रिभुवनीं थारा २
पृथ्वी आप तेज बीज जीव निपजे सहज ३
सहज पदार्थ शिव योगी पुष्प पत्रीं पूजेलागीं ४
ज्यानें ओळखिला शिव त्यासी न म्हणिजे जीव ५
बसवलिंग म्हणे शिव न ओळखी तोची जीव ६

## अभंग २८

सकळ जिवाचा एक धनी त्यासी ओळखीना कोणी १
एक पूजिती अंबिका कोणी ध्याती विनायका २
एक ह्मणती खंडेराव कोणी पूजिती भैरव ३
कोणी म्हणती ब्रह्मा दैवत विष्णु रुद्रची साक्षात् ४
एक म्हणती दश अवतार कोणी म्हणती तत्वसार ५
एकें शेंदूर लाऊन गोटा त्यासी म्हणती देव मोठा ६
ऐसें भुललें पामर त्यासी न कळे हें घर ७
अनंत अवतार ईश्वराचे माया प्रपंच त्रिगुणाचे ८
चार अवतार नामांकित दोन प्रगट दोन गुप्त ९
तया रज गुणाचे जाण दहा जन्मले सगुण १०
तम गुणाचीं महत्वें आदिनाथादि झाले सत्य ११
मोठा चैतन्य पसार थोर व्यापिले चराचर १२
बसवलिंग म्हणे स्वामी तुज वेगळें नेणों आम्हीं १३

## अभंग २९

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पश्चिमेचीं न कळे वाट परम गुरु दावी नीट १
षोडशेश्वरा मागे वाट सुईच्या वेजाहुनी नीट २
तेथें सत्रावी चोखट अमृताचा भरला घट ३
तेणें पंथें द्विदळा गेला तेथें विश्रांती पावला ४
एक हजार जप केला पन्नासाचा नेम झाला ५
तेथें इडा आणी पिंगळा चंद्र सूर्याचा झळाळा ६
नेत्रावरी असें नीट त्यासी म्हणावें त्रिकुट ७
तयामध्यें सूषुम्ना बाळा तिसरी असे सुढाळा ८
उर्ध्व पाकळीका आट श्रीहाटा वरी गोल्हाट ९
बसवलिंग म्हणे जाणा थोर सद्‌गुरुच्या खुणा १०

अभंग ३०

कोण जन्मले हो मेले आधीं विचारावें भलें १
बुडबुडा जेवीं जळीं क्षण भासे भंगे तळीं २
लावितां दीप प्रकाशला मालवितां कोठें गेला ३
रवी तडागीं देखिला जळ आटतां बिंबीं गेला ४
आला नाहीं कैसा गेला येतां जातां कोणी देखिला ५
बसवलिंग म्हणे खोल जन्म मरण हेंची फोल ६

अभंग ३१

सदाशिव ये गा वेगीं माझी लज्जा राखा जगीं १
बहु मजला श्रम झाले आतां पाहिजे सांभाळिले २
तुजएवढा दाता कोणी दुजा नाहीं त्रिभुवनीं ३
जरी करसी अव्हेर मज तुझाची आधार ४
त्वां बसावें माझें घरीं सुख संसार सागरीं ५

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बसवलिंग म्हणे अंतरीं तीर्थ यात्रा पाहूं बरी ६

अभंग ३२

शिव निराकार आहे आकारला जीव पाहे १
जीव न ओळखी शिवासी तेणें पडला गर्भवासीं २
गर्भवासाची दुर्गंधी नव मास पडला बंदी ३
गजबजोनी म्हणे शिव जन्मतांची झाला देव ४
धरी मागील आठव जीव वीरे उरें शिव ५
बसवलिंग म्हणे भाव जिकडे तिकडे सारा शिव ६

अभंग ३३

सारा ब्रम्हाकार आहे पृथ्वी पर्वतादि पाहे १
देव देऊळ राउळ ब्रह्मस्वरूप केवळ २
अठरा भार वनस्पती जीव जनांची उप्तत्ती ३
प्रतिमा ब्रह्मची स्वरूप धनधान्य धातूरूप ४
शक्ती पुरुष ब्रह्म पाहीं येथें भेद कांहीं नाहीं ५
बसवलिंग म्हणे देख आकाराचें सुख दुःख ६

अभंग ३४

विष्णु आपरूप आहे सारा रस आप होय १
विष्णु-स्वरुप कृपाळ आपा सारिखें निर्मळ २
आप जिवींचा जिव्हाळा सत्रावी ते जीवन कळा ३
आप सीतळ सोज्वळ गंध सुगंध परीमळ ४
आप निज बीज औषध पदार्थ तो परमानंद ५
बसवलिंग म्हणे खाणी हिरा लाल मोती पाणी ६

अभंग ३५

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

रुद्र स्वरुप तेजाळ सारा अग्नीचा कल्लोळ १
रुद्र तेज सर्वां ठायीं घटीं पटीं देहीं गेहीं २
काष्टीं पाषाणीं जळीं स्थळीं रुद्र तेजाची झळाळी ३
जेथें तेज नसें कांहीं तेथें जीवनकळा नाहीं ४
रुद्र प्रतापाची थोरी तिन्ही लोक अंगिकारी ५
बसवलिंग म्हणे दीप्ती रुद्र तेज आम्हां ज्योती ६

## अभंग ३६

जप करोनी काय होय वस्तू अजपची आहे १
उत्तम तो तयीं लीन मध्यम ध्यान धारणा २
कनिष्ठ तो देवार्चन अधम तीर्थयात्रा जाण ३
देवता देवी महा विघ्न मोठें इत्यादी दुर्जन ४
मिथ्या माया आवरण संसारासी हेंची कारण ५
बसवलिंग म्हणे देही वस्तू आहे तेची पाही ६

## अभंग ३७

सदाशिव कैसा आहे जैसा महदाकाश पाहे १
आकार कांहीं होणें नाहीं व्यापक तो सर्वां ठायीं २
जैसे घटीं मठीं गगन तैसा राहीला व्यापून ३
तत्वें झालीं त्या पासोन निराकार निरंजन ४
जैसा ज्याचा भाव आहे तैसा त्या सारिखा होय ५
बसवलिंग म्हणे ग्वाही आत्म पुराणांत पाही ६

## अभंग ३८

दैवत कवण तत्वाचें कवण लिंग दैवताचें १
याचें ऐकावें कौतुक लिंग कवण कवणा आंत २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ब्रम्हा दैवत पृथ्वीचें आचारलिंग ब्रम्ही याचें ३
विष्णू दैवत आपाचें गुरुलिंग तें विष्णूचें ४
रुद्र दैवत तेजाचें शिवलिंग तें रुद्राचें ५
ईश्वर दैवत वायूचें जंगम लिंग ईश्वराचें ६
सदाशिव आकाशाचें प्रसाद लिंग शंकराचें ७
पंचलिंग पंचमुख महालिंगासी ओळख ८
पाहे म्हणे बसवलिंग निरंजनीं आत्मलिंग ९

## अभंग ३९

येणें जाणें नाहीं आम्हां बीज भाजलें न ये कामा १
भरला कुंभ फुटूनी जाय तो मागुतीं हातां न ये २
लवण जीवनीं मिळुनी जाय तें मागुतीं हातां न ये ३
कर्पूर ज्योती मिळतां पाही तेथें भस्म नुरे कांहीं ४
उसा पासूनी गूळ होय गूळ पेरिता कांहीं न ये ५
बसवलिंग म्हणे खंडा मरण मारी तोचि गुंडा ६

## अभंग ४०

आत्मा नाहीं येत जात हें कोणासी नाहीं श्रुत १
नातें वर्ण नोहे व्यक्ती कैसी प्रकाशली दीप्ती २
नोहे श्वेत पित्त जाण नाहीं रक्त नीळवर्ण ३
नोहे शाम माया मन ब्रम्हा विष्णू रुद्रगण ४
ज्याचा गुरु स्वतः सिद्ध तोची जाणे हा निजबोध ५

## अभंग ४१

भक्तीचें धनुष्य वैराग्याचे ओढीं ज्ञानबाण सोडी देवावरी १
झुंजू गेलों वैरें तो देव स्वजाती झुंजू कोणा प्रती ऐसें झालें २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बसवलिंग म्हणे राहो खटाटोप झालों आप

अभंग ४२

मी तूं हें विराले एकरूप झालें रूपची
आतां देव आम्हीं झालों एकरूप द्वैताचा
जेवीं आम्ही देहीं तो देव विदेही अद्वैत प
आमुचेच हातें देव सर्व करी तेची जाणा
बसवलिंग म्हणे देव आम्ही एक होतसे कौ

अभंग ४३

जीव आणि शिव दोघे सख्खे बंधु आहे तो सं
तेथें शिवें केली मोठी ती शिष्टाई आमुचा भा
आपण आटोपिलें सगळें ब्रम्हांड आम्हां दि
तोही पिंड परी नाहीं चिरंजीव नाना योन
जन्ममरणातीत आपण राहिला आम्हां ला
कांहीं नेदी आम्हां न बोले धड गोष्टी आम्हीं होत
सोसवेना आम्हां जन्म आणि मरण मग गेलों
सद्गुरुनें केली दोघा बुझावणी मज केले
प्रपंच परमार्थ जीव केला शिव ऐसा गुरु
बसवलिंग म्हणे धन्य गुरुराज आम्ही कर

अभंग ४४

परमार्थ हा नोहे लेंकराच्या गोष्टी येथें व्हाव
दगडाहून जीव करावा कठीण अंतरींचा
मृत्यू झालें त्याची सांडावी ही आस तैसे व
बसवलिंग म्हणे करारांचें काम आहे त्यासि

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## अभंग ४५

युतीच्या प्रसंगीं मिथ्या साचपण सज्जना अवगुण लाविताती १
इंगळासी कोठें झोंबती इंगळ सुवर्णासी तांबे मिळे केवी २
भानुबिंब जळीं चंचळसा भास केवीं गगनास सत्य पहावें ३
तेवीं सत्यासत्य पहा विचारुनी जेवीं पयपानीं राजहंस ४
बसवलिंग म्हणे पहावें नयनीं मग त्या दूषणीं प्रवर्तावें ५

## अभंग ४६

काय करी प्राणी कर्म बळिवंत केलें तें रहात पुढें उभें १
गीतेमाजीं हरी बोलिलें वचन कर्मांची ही गहन गती असे २
शिवाच्या स्मरणें त्रैलोक्य उद्धरे राम वनीं फिरे कर्म बळें ३
भ्रतार भक्तीची दृढ चित्त बुद्धि सीता पडली बंदी रावणाच्या ४
अवदशा आली दमयंती नळा झाली अवकळा कर्म-बळें ५
नष्टचर्या आली तया पांडवासी केलें द्रौपदीसी नग्न सभें ६
अहिल्या ती शिळा इंद्रा पडली भगें चंद्राचिया अंगीं कलंक झोंबे ७
ऐसें परी आहे कर्म बळिवंत म्हणोनिया होत सुख दुःख ८
बसवलिंग म्हणे भवसेवे चुके तरी का मना घाकें व्यर्थ भीसी ९

## अभंग ४७

सद्भाव देखोन माझा । सगुण रूप धरून वोजा । पाहुणा गुरुराज आला हो बाई ।१। प्रमथ अंतःकरण जाण । चित्त बुद्धि आणि मन । चोपाळून आसन । स्वामीसी केलें । २ । अनन्य आवडी जळ । प्रक्षाळुनी चरण-कमळ । वासना ही उगाळून । चंदन लावू ।३। कामादि विकार सहा । घेऊनि इंद्रिय दहा । सुमनें करूनी पहा । वाहिली पायीं ।४। अहंकार जाळिला धूप । सुज्ञान उजळिला दीप । पंचप्राण हा अपूप

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नैवेद्य केला । ५ । रजतम सांडूनि दोन्ही । विडा दिला सत्वगुणी ।
स्वानुभवें रंगुनी । सुरंग दावी । ६ । बसवलिंग करी पूजा ।
पूजापूजक न दिसे दुजा । अवघा सद्गुरुराज । होऊनी ठेला । ७ ।

## अभंग ४८

पंच भूतिक सर्व पिंड मध्यें चैतन्य अखंड १
माझा देव सोवळा पाही त्यासी वोवळा विचार नाहीं २
तत्त्व एक आत्मा एक तेथें भेद नाहीं देख ३
गुरु कृपें कळलें वर्म बसवलिंगा सर्व ब्रम्ह ४

## अभंग ४९

देव जडला जाईना अंगा आतां काय करूं सांगा १
सर्व देवासी एक एक ठाणें याचें विश्वीं व्यापून राहणें २
वैद्य जोशी पंचाक्षरी कांहीं केल्या नोहे दुरी ३
देव काढाया शहाणे आले ते मज सारिखेचि झाले ४
देवें माझी पुरविली पाटी तेथून संसारासी काटी ५
नेणु पूर्वींचा ऋणी होता बसवलिंग सरता पुरता ६

## अभंग ५०

नाहीं इंद्रिय ज्यासी काय त्या बोलणें अपूर्व करणें देवाजीचें १
मुका कैसा बोले अंध कैसा देखे बहिरट तो ऐके कवण्या द्वारें २
नाहीं कर कैसा वाजवील टाळ कथेसी पांगुळ धावें कैसा ३
तरी त्याचा काय आहे हा अन्याय जया सर्व आहे त्याणें कीजे ४
श्रवण असतां नाम तें ऐकावें नेत्रानें तें पहावें शिव रूप ५
मुखें वाचा शुद्ध नामातें उच्चारा चरण असतां करा तीर्थ यात्रा ६
असतां हस्त ते वाजवावी टाळी सदा सर्व काळीं हेंची ध्यान ७

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बसवलिंग म्हणे मृत्यू खाय अंतीं नका काकुलती देहीं करूं ८

अभंग ५१

करी निंदा द्वेष पापी तो अधर्म देखोनी समागम सज्जनाचा १
आपण न करी करी त्यास निंदी मुखानें उच्छेदी नाना शब्दीं २
नाचोनीया गाती वाजविती टाळ आमुचें कपाळ उठवीती ३
कोणता तमाशा करा जागरण तेथें आमुचें मन बैसलेंसे ४
वेश्येचें विलासा गायन ते समजे दुजे कांहीं नुमजे ऐकतांची ५
बसवलिंग म्हणे उष्ट्राचिया पुढें ठेविलीं नावडे रंभा फळें ६

अभंग ५२

मुळीं बाप होता ज्ञानी तेव्हां लागलों ह्या ध्यानीं १
जगीं बाप ऐसा व्हावा त्याचा वंश मुक्तीस जावा २
पोटीं येतां हरलें पाप लिंगेश्वर माय बाप ३
बसवलिंग पोटींचा बाळ त्याची पुरविली आळ ४

अभंग ५३

धन्य भू कैलास धन्य कपिलाधार शिवराजें साचार वास केला १
काय वर्णूं वाचे तेथींचीही थोरी धन्य कपिलाधारीं रहाती जे २
सिंधूसरिता सिंधू पुण्य क्षेत्र काशी पाहाती अहर्निशीं सर्व काळ ३
सकळ दोषाचें प्रायश्चित घडे कपिलाधारी पडे जळ मार्या ४
जीवन मुक्त आहे शिवराज समाधी पाहिल्या उपाधी तुटे बंध ५
पाषाण तरुवर स्वर्गीचें अमर धरून अवतार रहाती तेथें ६
बसवलिंग म्हणे तारावया जन वसे आनंद घन ऐक्य रूपीं ७

अभंग ५४

धन्य कपिलमुनी जेथें वास्तव्य करी । ज्याचा योग सिद्धस नेला ऐसा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

हा गिरी । १ । धन्य कपिलेश्वरी नांदे आमुचा शिवराज । संताचें माहेर प्रगट केलें निजगूज । २ । धन्य कपिलाधार सकळ तीर्थांचा राजा । धन्य धेनुरूपें प्रगटे भक्ताच्या काजा ।३। धन्य ती शिवगंगा धन्य कपिलाधार । धन्य नागझरी संगम झाला साचार । ४ । धन्य जया स्थळीं नाना परीचे तरूवर । धन्य पक्षी हरहर नामें गर्जती अपार ।५। मुंजा महिषासूर सर्प व्याघ्राची खोरी । धन्य तो शिवराज अवघी केली शिवपुरी ।६। धन्य कपिलाधार सकळ सिद्धांची भूमी । समाधिरूपीं नांदे बसवलिंगाचा स्वामी । ७ ।

॥ बसवलिंगाचे अभंग समाप्त ॥

# ॥ श्री महादेवाचे अभंग प्रारंभ ॥

रूप सगुण सुंदर नाम शोभे श्रीशंकर १
माझें हृदय भुवन करा आपुलें सिंहासन २
इतुकें द्यावें मज आतां दीन बंधू विश्वनाथा ३
म्हणे महादेव किंकर जवळीं रहा निरंतर ४

अभंग २

सगुण स्वरूप दृष्टीनें पाहिलें तेणें माझें झालें समाधान १
शंकर हें नाम वदे ज्याची वाणी धन्य तोची प्राणी। पुण्यवंत २
अनंत जन्माची सुकृताची गांठी तेणें धुर्जटी मित्र केला ३
महादेव म्हणे धरा संत-संग जेणें उमारंग ओळखिला ४

अभंग ३

सहस्र वदनाचा वर्णितां शिणला तोही हार झाला कंठीं ज्याच्या १
पराही पश्यंति मध्यमा वैखरी वेद वाचा चारी मौनावल्या २
भांबावले साही अष्टादश वेडीं काळाची बोबडी वळली तेव्हां ३

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

महादेव म्हणे काय बोलूं फार अंत नाहीं पार तुमचा देवा ४

अभंग ४

पंचवदनाचें एक्या अननानें होईल वर्णन केवी घडे १
दश पाणी ज्याचें काय दो करानें करावें पूजन सांग कैसे २
दश अक्ष ज्यातें द्वय नेत्रीं जाण धरावें तें ध्यान कैसे आतां ३
महादेव म्हणे वेडावला जीव मनाचीही धांव खुंटलीसे ४

अभंग ५

नवनिधी द्रव्य कुबेर भांडारी आम्हीं दीन द्वारीं बाहातसो १
मुक्तीचे याचक मागो आलों दान सायुज्याची खाण उघडी देवा २
येणें जाणें खत फाडोनी टाकावें अक्षयीं राखावें पाया पासी ३
महादेव म्हणे पुरे येरझार हेंची गौरीहर देई आतां ४

अभंग ६

ब्रम्हांड मंडप भासे लिंगाकार साळूंका आकार धरा दिसे १
सर्वाभूतीं रूप पहातां दयाळू विसरली हाळूं पाती तेव्हां २
खुंटली वैखरी लाचावलें मन दाही दिशा पूर्ण रूप तुझें ३
महादेव म्हणे संपला अंधार सूर्य गौरी हर उदया आला ४

अभंग ७

नग दुहितेचा पति मित्र जोडूं कळिकाळाचा पाडु काय आम्हां १
सुखाचें अगर वेदाचें जें सार साधूचें माहेर आनंदाचें २
आनंदाचा कंद दयेचा सागर चातकाचा आहार मेघ जैसा ३
महादेव म्हणे भव भय नाहीं कोंदलें सबाह्य शिवरूप ४

अभंग ८

शिव शिव दोन्ही अक्षरांचा मंत्र चालतो स्वतंत्र आजपतो १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

एकतीस सहस्र सहाशें तें जाण मुळीं हें प्रमाण ऐसें आहे २
उलटें सुलटें फिरतसें यंत्र सगुण स्वतंत्र हेंची खरें ३
महादेव म्हणे निर्गुण आधार चालतो व्यापार सकळीका ४

अभंग ९

जाळिला मदन अग्नीनें अक्षाच्या मोडीला दक्षाचा यज्ञ जेणें १
त्रिपूर मर्दुनी निर्जरा रक्षिलें विष तें भक्षिलें अनिवार २
शोधिला उदार तुम्हा ऐसा कोण दशकंठा दान केली अंबा ३
महादेव म्हणे मागावें तें काय सोडूनिया पाय तुमचे देवा ४

अभंग १०

माझी दीनाची करुणा परिसावी उमा रमणा १
देवा धरिली तुमची कास झालों दासाचाही दास २
रंक म्हणोनी द्यावें दान करा पतिता पावन ३
महादेव म्हणे आतां देवा अंत काय पहातां ४

अभंग ११

धन्य धन्य शिव-भक्ति अढळ सायुज्याची मुक्ति १
रूप समीप सलोकता जन्म होय पुण्य सरतां २
नाहीं कळिकाळांचें भय मग इतरांचें काय ३
म्हणे महादेव अवचित जन्म होय लिंगायत ४

अभंग १२

पृथ्वीवर देवा तीर्थेंही उदंड परी तें दहावें खंड पुण्य-भूमी १
पर्वतांत गंगा निघाल्या सकळ भागीरथीचें मूळ स्वर्ग स्थानीं २
सुरसरिता ऐसें नाम ज्या मातेसी सर्व ऋषि देवां पूज्य झाली ३
महादेव म्हणे जल बिंदू मोक्ष होत देत साक्ष वेद श्रुति ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अभंग १३

काशी काशी हा उच्चार ज्याचें वदनीं निरंतर १
त्याच्या पुण्या नाहीं सीमा द्यावी कोठील उपमा २
अविनाश महा क्षेत्र तेथें नांदे तो त्रिनेत्र ३
महादेव म्हणे लाभ देतो पार्वती-वल्लभ ४

अभंग १४

पाहूं भूकैलास करू काशी-वास ऐसें अविनाश स्थळ नाहीं १
देव उमाकांत भेटतो निवांत ब्रह्मची करित दासालागी २
जन्म मरण कांहीं येणें जाणें नाहीं मुक्ति लोळे पायीं सदा त्याच्या ३
महादेव म्हणे लोखंडाचें सोनें झालें खरें नाणें चौसष्टीक ४

अभंग १५

बंध आणि मोक्ष होंचि द्वैत पक्ष स्वरूप अलक्ष लक्षांतीत १
तत्वमसी वाक्य शोधोनियां पहावें व्यर्थ कां शिणावें खटाटोपें २
तांडित वाल्मिक मरे तो उमग तैसें वाया अंग कृश केलें ३
महादेव म्हणे यापरती खूण नाहीं वाहतो आण शंकराची ४

अभंग १६

त्रिगुणाची वळ्ली वाती दिव्य प्रकाशले ज्योती १
नाम रूप हेंची सगुण नाहीं मुरले मी तूं पण २
अलंकार सर्व आटलें अवघे सुवर्णची झालें ३
महादेव म्हणे हर मुळचा आहे निराकार ४

अभंग १७

उमावल्लभ शंकराचे ध्यान विराट रूपाचें १
जलधर हा कमंडल सप्त पाताळीं पाउल २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दिशा वसन शशी मित्र झाले ज्याचे दोन्ही नेत्र ३
मेघमाळा जया वर्षती तुम्हा स्नान पशुपती ४
नक्षत्रें होतीं पुष्पे हार कैसा पुजूं हा शंकर ५
महादेव म्हणे विराट अंत नाहीं कोठें मुगूट ६

अभंग १८

माझें जीविचें जीवन देव पार्वती रमण १
काया वाचा आणि मनें झालो अनन्य शरण २
ऐसा निश्चय जयाचा योगक्षेम वाहे त्याचा ३
म्हणे महादेव निर्गुण भक्तासाठीं झाला सगुण ४

अभंग १९

शुद्ध संकल्पाचें फळ करी ब्रह्मचि केवळ १
वृत्ती पालटोनि जाय चित्त समाधानें राहे २
मन बुद्धि एक झाली स्मरणीं हळहळ गेली ३
म्हणे महादेव किंकर झाला अवघाची शंकर ४

अभंग २०

रोपिलें तें वरी आलें तेंचि फळ प्राप्त झालें १
कडवट आणि मधूर बीजा सारिखे अंकूर २
लावितांहो इक्षुदंड कैसा उगवे एरंड ३
महादेव म्हणे पुण्यें केल्या कीर्ति काय उणें ४

अभंग २१

गंगेनें त्यागिलें-ग्राम थिल्लरेसी शरण कवणासी जावें तिणें १
मत्स्यावरी जळ जरी कोपू पाहें तरी प्राण जाय तत्क्षणीं २
वृक्षानें पक्षांसी ठाव नाहीं दिला तरी व्यर्थ गेला जन्म त्याचा ३

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

महादेव म्हणे आम्हीं लिंगाईत ध्यान धारणेंत भवा तुझ्या ४

अभंग २२

ब्रह्मची तें ब्रह्मार्पण दुजें नाहीं त्या समान १
प्रकाशले रत्नदीप काय तेथें स्नेह तुप २
मिथ्या मनाच्या त्या ओढी मुरडी शुन्याची नरडी ३
म्हणे महादेव मनढोर बांधू नासाग्रा समोर ४

अभंग २३

कनक सुमनें पूजिला कनका-चळ जीर्णदशीनें चंद्राचें मंडळ १
क्षीर सिंधूसी नैवेद्य तक्रबिंदु हे कां शोभेल शंकरा दीनबंधू २
आम्हां लागीं सगुण ब्रम्ह झालें आतां सांभाळावें ब्रीद आपलें ३
तुम्हां योग्य शोधिता काय नाहीं म्हणे महादेव जिंकीयेल्या साही ४

अभंग २४

गर्जती पुराणें भोळ्या नीळकंठा दीनाची उत्कंठा शांत करी १
त्रैलोक्याचा नाथ ऐकियलें कानीं काय शूळपाणी अंत पहासी २
प्राण गेला जरी पृथ्वीचें उदक न घेतां चातक मेघावीण ३
महादेव म्हणे देवा तुझी आण अन्याशीं मी शरण जाय जरी ४

अभंग २५

गौरवर्ण कांति वरी स्फटिक शोभा स्वानंदाचा गाभा भासे जेवीं १
चंद्रचूडामणी नाम हें गोमटें बहु प्रिय वाटें मना माझ्या २
त्रिताप हारक त्रिपुंड्र रेखिला तृतीया झाकिला नेत्रभाळीं ३
महादेव म्हणे ध्यान तें अंतरीं सायुज्य मांदिरीं हेंची आहे ४

अभंग २६

निराकार रूप आकाराशीं आलें दिसूं जें लागलें दृष्टीपुढें १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

निवालें अंतर सुखावलें सुख तहान भूक जाण विसरली २
चिदानंद चित्त होऊनिया ठेलें कोण बोले चाले न कळेची ३
महादेव म्हणे कंठ सद्गतीत वारंवार होत शंभुराया ४

अभंग २७

नको षड्मुद्रा पंचाग्नीचा ताप मौनाचा संकल्प तोही नको १
नको याग यज्ञ महा घोर तप गुहास्थळीं जप तोही नको २
सप्त कोटि मंत्र उच्चाटण यंत्र कांहीं एक तंत्र नको देवा ३
महादेव म्हणे राजयोग बरा सुखें येतो घरा उमाकांत ४

अभंग २८

ब्रह्मरूप भासे अवघाची संसार पहा सारासार विचारूनी १
अनुभवाविणें बोलुं नये फार तेव्हां गौरिहर वश होय २
कल्पनेचे मूळ शोधूनि टाकावें भेदुनी असावें सहज स्थिती ३
महादेव म्हणे धन्य राजयोग त्रिवेणींचा ओघ हाची होय ४

अभंग २९

अढळ समाधी ढळेना सर्वथा हेंचि आयुज्यता श्रुति म्हणे १
मेलें पांघरूण जितें पांघरीना तोचि नर जाणा जीवनमुक्त २
दग्ध पटसम शरीराचा भाव तरी देवराव तोचि झाला ३
महादेव म्हणे आनंदाश्रु नेत्रां दिसे पंचवक्त्रा ध्यान तुझें ४

अभंग ३०

मंत्रामाजीं पंचाक्षर देवामाजीं श्रीशंकर १
तैसें नाम कलियुगीं सेवितां करी अरोगी २
नामरूपा आलें फळ नाम ब्रम्हचि केवळ ३
म्हणे महादेव सदोदित आम्हीं घेऊं नामामृत ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अभंग ३१

आपुल्या स्वाहितां धरियेली कांस विदित पायास सर्व आहे १
पार्वती शंकरा वांचुनी आसरा नाहींहो दातारा कोठें आम्हां २
उपेक्षिलें जरी लागेल दूषण आपुलें भूषण सांभाळावें ३
महादेव म्हणे घेतलें धरणें सांगावें गाऱ्हाणें कोणापाशीं ४

अभंग ३२

शिवभक्त ऐसें बोलती हे जन दुजीया शरण कैसें जावें १
कल्पतरुवासी न शिवे बाभूळ तैसें आम्हां फळ काय तेथें २
धनवंत पुत्र फिरे लोकद्वारीं अन्नछत्र घरीं असूनिया ३
महादेव म्हणे देवादिदेवा द्यावी मज सेवा अखंडित ४

अभंग ३३

आपुलिया चाडां तुम्हा शिणविलें भूलोकीं आणीलें देवा तुम्हा १
आतां कैचें जाणें येणें झालें हें अक्षयीं दासाचें हृदयीं रहावें देवा २
सगर कुळांत भक्त भगीरथ तेणें गंगातीर्थ आणियले ३
महादेव म्हणे रंकाचें भूषण नघडेची देणें पुन्हा त्यास ४

अभंग ३४

तृषाक्रांता लाभे शीतळ उदक तोचि जाणें सुख त्याचें तोचि १
बहुतां दिवसां जननीची भेटी बाळ घाली मिठी कंठी तीच्या २
तैसें तुम्हाविणें झालें देवराया सोडवेना पाया तुमचें आम्हां ३
महादेव म्हणे कृपणाची गांठी हृदयीं संपूटीं धरीयेली ४

अभंग ३५

संकल्प विकल्प अवघें कर्म धर्म जाण
झालें ब्रम्हार्पण माझें झालें ब्रम्हार्पण १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

षड्रिपु काम क्रोध मदमत्सर तरंग
नको याचा संग मज नको याचा संग २
पुनरपि जन्म मरण असो लाभहानी
बद्धमुक्त दोन्हीं नलगे बद्धमुक्त ३
महादेव म्हणे पुरे अलंकार
सोने निरंतर सोने असो ४

## अभंग ३६

धन्य गुरुरायें दाखविली सोय अनाथाची माय कृपावंता १
नेत्रामाजीं जेणें भरलें अंजन तेणें निरंजन सामोरलें २
चित्त अंचवीले चैतन्य वाढिले द्वैतासी धाडिलें देशांतरा ३
महादेव म्हणे भक्त आणि देव उरला नाहीं ठाव पहातां येथें ४

## अभंग ३७

मसुरे प्रमाण जेवीं मुक्ताफळ पहातां अचळ दृष्टीपुढें १
स्मरण उपाधि नाठवेचि कधीं सहज समाधी सुखावली २
कोठील उपमा द्यावी येथें कोणी वेदाचीही वाणी मौनावली ३
महादेव म्हणे हेंचि निजगुण पाहिजे निर्वाण भक्ति येथें ४

## अभंग ३८

जीव शिव ऐक्य झाल्याविणे जाण कोठील प्रमाण द्यावें यासी १
दुग्धांमाजी लोणी मंथनावाचोनी बोलताती शहाणे नये हातां २
जरी व्हावा देव ऐसे वाटे तूज गुरुमुखें बीज घेई बापा ३
महादेव म्हणे पापाचें गांठोडें ठेवी एकीकडे बांधोनिया ४

## अभंग ३९

शिव शिव वेळोवेळां जिव्हेलागीं लागू चाळा १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सकळ जगाचें जीवन जडो डोळां माझ्या ध्यान २
तीर्थें यात्रा पायीं घडो परोपकारा देहीं पडो ३
म्हणे महादेव हेंचि द्यावें वारंवार जन्मा यावें ४

## अभंग ४०

दक्ष दुहितेचा रमण तेणें मोहिलें माझें मन १
जनीं वनीं चहूंकडे दिसे सुंदर रूपडे २
सनकादिकाचें निजगुण सोलिवाचें सोलिव बीज ३
म्हणे महादेव ब्रम्हांड भरूनि उरलें तें अखंड ४

## अभंग ४१

प्राणहीन देह नाथहीन घर कोरडा सागर जळावीण १
देवा तुम्हीं आम्हां उपेक्षिलें जरी दुजा धरेवरी कोण आहे २
दिनानाथ नाम बांधियलें ब्रीद आतां भेदाभेद निवडूं नये ३
महादेव म्हणे स्वामी या शंकरा पाहिजे दातारा कृपा तुझी ४

## अभंग ४२

शिवशिव वाचे कां नये फुकाचे घेता काय खर्चे सांगा बा रें १
ऋषी मार्कंड्य जपे तो तातडी तेणें काळ दंडी फिरविला २
चतुर्दश वर्षें अल्पची आयुष्य नाम ह्या पियूषें अमर केलें ३
महादेव म्हणे कलीमाजीं सार नामचि आधार भक्तालागीं ४

## अभंग ४३

अठरा योगामाजीं राजयोग श्रेष्ठ सांगे नीळकंठ पार्वतीसी १
जरी उदंड माजविलें बंड समाधि अखंड राजयोग २
बोलतां चालतां सदा देतां घेतां ढळेना सर्वथा दृष्टीपुढें ३
महादेव म्हणे राजयोगी नर करुनि संसार लिप्त नाहीं ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अभंग ४४

अधिकार काय पहतां पतिताचा झालों काया वाचा दास आम्हीं १
शिवभक्त म्हणोनी उद्धरावे देवा सांभाळावे नांवा आपुलिया २
आम्हा कैची लाज जन्म घ्यावयासी मिरास चौऱ्यांशी मुळची आहे ३
महादेव म्हणे कुबेराचा सुत फिरेल मागत रंका पुढें ४

अभंग ४५

ललाट पट्टांत तुम्हीच लिहिलें निमित्तासी केलें पात्र आम्हां १
देवा तुम्हां आला भक्तांचा हा त्रास असा सावकाश येकलेचि २
देवा म्हणोनिया हाका मारी कोण पहा विचारून मना माजीं ३
महादेव म्हणे वाटेल निर्वाण कैचें मी तूं पण येथें आहे ४

अभंग ४६

शब्द ब्रम्हची जाणावें श्रवणाविणें काय घ्यावें १
शास्त्रें पुराणें प्रसिद्ध शब्दें झालें चारी वेद २
निरूपण न ऐकून कैसें होईल भजन ३
महादेव जया शरण शब्द ब्रम्हची स्फुरण ४

अभंग ४७

सुंदर रुपडें दिसे दृष्टी पुढें
मन झालें वेडें मन झालें वेडें १
अगा कैलासीच्या स्वामी देवराया
दंडवत पायां तुमच्या दंडवत पायां २
चौसष्ट कोटि गणासहित आपण
दंडवत पायां तुमच्या दंडवत पायां ३
महादेव जोडे पाणी परिसा वेगीं शूळपाणी
नाचावें रंगणीं माझ्या नाचावें रंगणीं ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

### अभंग ४८

शिव शिव शिव त्रिवार बोलतां पाप जाय हातां मोक्ष जोडे १
आणिक साधन नाहीं या समान दुजें नामावीण कलियुगीं २
सुधर्म रायासी नाम जीवविले भक्त उद्धारिले असंख्यात ३
महादेव म्हणे नामें बालावृद्धा केलें महानंदा मोक्षभागीं ४

### अभंग ४९

देव पहातां रतिहूनी लहान श्रुति निरुपण ऐका बारें १
अहंब्रम्ह म्हणोनी दुसरें प्रमाण आतां भिन्नाभिन्न कैचें येथें २
परि तें ब्रम्हांड भरुनी उरलें शेष दशांगुलेंवरी असे ३
महादेव म्हणे सद्गुरु वाचून नकळे ती खूण कोठें आहे ४

### अभंग ५०

अनंत ब्रम्हांड भरुनि उरलें दृष्टी समोर आलें भाविकांच्या १
योग याग तप मौन जयासाठीं तो हा धूर्जटी मागेंपुढें २
शुद्धकृष्णपक्ष निभिड अंधार लिंग निरंतर ज्योतीरूप ३
महादेव म्हणे अढळ अभंग माझा उमारंग चहूंकडे ४

### अभंग ५१

उदार म्हणोनि ऐकियलें कानीं गर्जती पुराणें शास्त्रें साही १
बहुतांसी केलें देवचि आपण तेथें मी तूं पण उरलें नाहीं २
कृपणता कैशी आतां हो धरिली मुक्ति ती सरली ऐसें वाटे ३
महादेव म्हणे स्वामी उमारंगा शरण जाऊं सांगा कोण्या देवा ४

### अभंग ५२

त्रिवेणी संगमीं पर्व हें ओंकार अर्ध चंद्राकार भास होतो १
मयूर पिच्छाच्या वरील ते डोळे रक्तपीत निळें कृष्ण शुद्ध २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तया पलिकडे सुंदर रूपडें पहातां दृष्टी पुढें सुख वाटे ३
महादेव म्हणे अलक्ष तें लक्षी विहंगम पक्षी द्वाहि बारे ४

अभंग ५३

लोकलाजेवरी सोडियलें पाणी नाचूं या कीर्तनीं आनंदानें १
गाऊं ते अभंग ज्याशीं नाहीं भंग आणूं उमारंग हृदयामाजीं २
या परतें ज्ञान नायकों श्रवणीं ठेवा तें बांधूनी असलें तरी ३
महादेव म्हणे आम्ही शिवदास येथें नाहीं आस दुजियाची ४

अभंग ५४

क्षीर सिंधूतिरीं चातकाचें रहाणें परि मेघाविणें तृषाकांत १
तैसें वीरशैव आम्हीं क्रियावंत झाला जरी अंत सुख मानूं २
देवा तुम्हाविण दुजिया शरण जाईल हा प्राण तत्क्षणीं ३
महादेव म्हणे सखा शितिकंठ वारील संकट पडिलें जरी ४

अभंग ५५

भाळीं स्रवते चंद्रामृत आनंदले चकोर भक्त १
मौळी गंगेचें जीवन करी त्रैलोक्या पावन २
परोपकारी हें भूषण म्हणूनि केला नंदीवहन ३
महादेव म्हणे देवा आम्हां द्यावी तुमची सेवा ४

अभंग ५६

विश्वाची जननी वामभागीं शोभे स्वानंदाचा गाभा देवा तुम्ही १
पुत्र विघ्नहारी विद्येचा सागर दक्षिणांकी सुंदर शोभतसे २
विधी रमावर असुर अमर सेवेसी सादर निशिदिनीं ३
महादेव म्हणे स्वामी हा सर्वांचा नाथ अनाथाचा दीनबंधु ४

अभंग ५७

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अहंब्रह्म म्हणुनी झाला प्रथम गजर
त्रिगुणाचा भासे मेळा सगुण आकार १
ध्वनी तेचि माया तुर्या छायारूपें आली
ब्रम्हा विष्णु बाळें दोन्ही गर्भी सांभाळिलीं २
शिव शक्ति आदी मूळ चराचर सकळ
कैचें तेथें यातीकूळ काय गोत्र काय सांगू ३
स्फूर्ति ब्रम्हीं ऐक्य झाली गुंडाळिला खेळ
महादेव म्हणे जैसें तैसेंचि अचळ ४

## अभंग ५८

गर्भवास प्रिय मोठा द्यावा मज नीळकंठा १
जन्मोजन्मीं तुझे गुण देवा आवडीं गाईन २
नको मज मोक्षसुख वारंवार दावा मुख ३
महादेव म्हणे जिणें व्यर्थ शिव-कृपेविणें ४

## अभंग ५९

द्यावी सेवाची निकटा भक्ति असो एकनिष्ठ १
अणुरेणु परिणाम यात्रें पहाण्यांत समान २
स्थूळ सूक्ष्म कारणं यांत नोहे भिन्नाभिन्न ३
म्हणे महादेव आम्हांशी करुनि द्यावी ही मिराशी ४

## अभंग ६०

जेणें स्वहृदय संपुटीं सांठविला शिव धूर्जटी १
जन्म मरणाशीं ना तळें त्यासी ओगाळिलें काळें २
जाहला सुरासुरा वंद्य डोळें सहज निजानंदें ३
म्हणे महादेव भवतारू करी जिवा पैलपारू ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## अभंग ६१

मज कैचें ज्ञान खरें बोलविलें श्रीशंकरें १
करू पृथ्वीचें वजन आणूं ताजवा कोठून २
कोण्या मापें मोजूं सिकता कैचा सविता लागे हाता ३
महादेव म्हणे कर्म खोटें पाहूं जातां मन फाटें ४

## अभंग ६२

नरजन्म गेला वाया तुम्हांविणे देवराया १
नाहीं शोधिले सारासार मग कैचा परोपकार २
घडलें नाहीं तीर्थाटन अनिवार नावरें मन ३
म्हणे महादेव तारुण्य गेलें आलें वृद्धपण ४

## अभंग ६३

कृतयुगीं लक्षवर्ष होतें मानवा आयुष्य १
घोरतपें आचरोनी वश केला शूळपाणी २
त्रेतायुगीं दहाहजार झाला सुफळ बाजार ३
लक्षावरिलें गेलें शुन्य मोजू जातां आलें उणें ४
एकसहस्त्रतें द्वापार दुजें शून्य झालें ठार ५
शतवर्षें अवघा कली म्हणे महादेव अर्धी गेली ६

## अभंग ६४

कलिमाजीं घटिका औट भेट देतो नीळकंठ १
ज्याचा भावशुद्ध आहे त्याचे हृदयीं देव राहे २
ऐसी शास्त्रें देतीं हाका भजा तुम्ही देवा एका ३
हिरा परीक्षोनिया तोय गार म्हणूनी टाकूं नये ४
जरी सुचित साह्य झालें म्हणे महादेव व्यर्थ गेले ५

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अभंग ६५

ज्ञान अज्ञानाची पातीं मिथ्यापणें लवत होतीं १
स्थिर नेत्राचें आगर ज्ञान शोभे मनोहर २
सहज समाधीसुखां जीव करी शिव सखा ३
महादेवा वाटे कोडें रूप भासे चहूंकडे ४

अभंग ६६

धालेपणाचे ढेकर जेवी त्यासी वारंवार १
काय गर्भीणीची खूण वांझ सांगेल कोठून २
तैसें आहे ब्रम्हज्ञान गुरुवीण नोव्हे जाण ३
महादेव म्हणे जळ तृप्ति करी जाश्वनीळ ४

अभंग ६७

अर्धनारीनटेश्वर ध्यानीं शोभे तो शंकर १
पहा नेत्र आनंदलें आजि पाहिलीं पाउलें २
कोटि मदन लहरी शोभे तया मुखावरी ३
अर्ध चंद्र भाळीं वाहे तोहा महादेवा साह्य ४

अभंग ६८

नग्न मौन जयासाठीं विवरी कोरिली कपाटी १
पंच अग्नीधूम्रपान घेती दर्भाग्रीं जीवन २
कोण तपाचें सांकडे तो हा उभा आम्हांपुढें ३
म्हणे महादेव वीरशैवा धन्य जन्मलिंग सेवा ४

अभंग ६९

सिंधु मसीपात्र उर्वीचें पत्र लिहिती विचित्र कंजकन्या १
शेवटींचा शेरा करावा श्रवण धरियलें मौन शारदेनें २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

राहिली लेखणी ठेवियली कानीं काय अन्य प्राणी करील येथें ३
ऐसियाशी गुण नाहीं वर्णविलें महादेव बाहुलें नाचवी तूं ४

अभंग ७०

कोटि कीटकांचे वधीं माझी मानावी उपाधी १
काया वाचां झालों दास तुझी धरिली दृढ कास २
सिंधू उपसी कपोता गुण सिंधू तैसें आतां ३
मनीं धरियली हाव पुरवा म्हणे महादेव ४

अभंग ७१

चित्त हें चैतन्य ध्यायें झालें ध्यान ज्ञेयेरूपीं ज्ञान विसावलें १
शब्दाची राहटी गगन संपुटीं शून्यची शेवटीं तेथें आले २
द्रष्टा आला एक तेंचि ब्रह्म सुख संसाराचें दुःख मावळलें ३
तया पलीकडे निश्शून्य रोकडें महादेव बापुडें कैचें तेथें ४

अभंग ७२

कोठील मी कोण कळलेंच नाहीं लावा माझी सोय विश्वनाथा १
अस्थि मांस चर्म बांधिलें देऊळ सांगायाचें मूळ कैसें आहे २
नाहीं तेच आळ करितो उपाधी म्हणूं नये वादी देवा मज ३
महादेव म्हणे विनोदाचे बोल तुम्हांवीण फोल सर्व दिसें ४

अभंग ७३

मन मोहिलें शिव शंकर सुटे प्रेमाचे पाझर १
जनीवनीं पहतां उभा दिसे स्वानंदाचा गाभा २
नाहीं कोठें रिता ठाव भरूनि उरला सर्व देव ३
म्हणे महादेव वट बीज तैसें आहे ब्रम्ह तेज ४

अभंग ७४

परिसाचें थोरपण लोहाविणें ठेवी कोण १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वैद्यें रसायन केलें रोग्यात्रिणें व्यर्थ गेलें २
दिनप्रकाश सुंदर त्याचें ग्राहीक अंधार ३
म्हणे महादेव आम्ही म्हणूनी देव झाला तुम्ही ४

अभंग ७५

तोचि एक भाग्यवंत आकळिला उमाकांत १
नम्र झाला सर्वांभूतीं भासे शिवाची विभूती २
द्वैताद्वैत मावळलें ऐक्यरुपीं फळा आलें ३
उरलें नाहीं दुजेंपण तया महादेव शरण ४

अभंग ७६

आम्ही ब्रम्ह झालों म्हणून लोकां सांगे उपदेशून १
नोहे फुकाचें तें बोलणें कठीण आहे सम तोलणें २
योगियाची निजखूण जाणें योगीच निर्वाण ३
महादेव म्हणे स्वाती जळा वांचुनी कैंचे मोतीं ४

अभंग ७७

व्यर्थ गेला जन्मसारा दावी पाय गौरिहरा १
अपराधी मी पतित आपुलें नाम दिनानाथ २
पाडसा सोडून वनीं कैशी राहील हरणी ३
तुम्ही जननी जनक म्हणे महादेव बालक ४

अभंग ७८

सदाशिव नाम चतुर अक्षरीं जपे जो अंतरीं सर्व काळ १
तीर्थें त्याचे पायीं ठेवितीहो माथा रजधुळीं नाहातां सुखावलीं २
ब्रह्मादिक ज्याचे वंदीती चरण जितेचि मरून मुक्त झालें ३
महादेव म्हणे सर्वांशीं आधार जीव चराचर उद्धरलें ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अभंग ७९

कूर्मनाभीशीं आधार दिला एक रोमावर १
त्याचे पृष्टिवसुंदरा धरी आपण शंकरा २
शेष रूप तें आपुलें ऐसें वेदें निरूपिलें ३
केली ब्रम्हांड उभवणी लोळे महादेव चरणीं ४

अभंग ८०

आहो अनंत ब्रम्हांड रचियलें का शी खं ड १
तया स्थळीं निरंतर राहे पार्वती शंकर २
क्षण एक भक्ताध्यानीं राहे उभा तो कीर्तनीं ३
महादेव बा हु लें बोलविलें तैसें बोलें ४

अभंग ८१

गज चर्माचें भूषण व्याघ्र त्वचेचें आसन १
नरमुंडांचा प्रियहार तृतीयनेत्रीं वै श्वा न र २
कर्णीं कुंडलें व्याळाचीं दिव्य शोभा नगत्राळाची ३
म्हणे महादेव किंकर देवा माझा नमस्कार ४

अभंग ८२

भव सागरीचें नाम झालें तारूं करी पैल तारू भाविकासी १
सुकाणूं धारका जाउनि पुसावें आधी का रुसावें देवावरी २
सद्गुरु वांचोनि आपणासी कोण ग्रंथही वाचूनी काय केलें ३
महादेव म्हणे अनुभवाविणें कैलासीचे केणें नये हातां ४

अभंग ८३

देव कोठे आहे सांगा ज्याच्या मुकुटीं वाहे गंगा १
आंगीं विभूती भूषण द श भु ज पंचवदन २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दक्षबाळा वा म भा गीं दीनबंधू म हा यो गी ३
म्हणे महादेव किंकर तया माझा नमस्कार ४

अभंग ८४

संचित प्रारब्ध आणि क्रियाविण डुबलें हे गहण पायापाशीं १
चित्त मन दास करावे दातारा कल्पनेचा थारा मोडी देवा २
झाडोनि या अंग करावें निःसंग हेंचि उमारंग द्यावें आतां ३
महादेव म्हणे देवभक्त एक झाल्याविणें सुख कोठोनिया ४

अभंग ८५

आपुला म्हणोनि सांभाळावें देवा घडो कांहीं सेवा तुमची मज १
लडिवाळपणें बोबडें बोलणें साबडेंचि रहाणें उमापती २
अश्लाघ्य म्हणोनी टाकूं नये दुरी श्लाघ्यतेचि थोरी करुनी दावा ३
महादेव म्हणे समर्थाचा दास मान्य तो सर्वांस सहज होतो ४

अभंग ८६

मंद बुद्धि माझी कैसे गावे गुण जिव्हाग्रीं आपण बसा देवा १
मुक्याचा वाचाळ चालेल पांगुळ जरि जाश्वनीळ वश झाला २
मूर्खाचा पंडीत होईल निश्चयें जरि त्यासी साह्य तुम्ही झाला ३
महादेव म्हणे देवा तूं परिस लोह आम्ही त्रास फार दिला ४

अभंग ८७

डोळे तुम्हाशीं प्रार्थना पहा कैलासीचा राणा १
ऐका उभय कर्ण माझ्या शंकराचे गुण २
शिव वदे वाणी घर टाळीया कीर्तनीं ३
महादेव म्हणे मन झालें सहजची उन्मन ४

अभंग ८८

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कोटी ते पुण्याचे पर्वत म्हणूनि झालों शिवभक्त १
आतां इतुकेंचि द्यावें येणें जाणें खूंटावें २
कठीण हा गर्भवास क्षीण झाला नऊमास ३
म्हणे महादेव देहक्लेश भोगितां झालों कासावीस ४

## अभंग ८९

गुरुरूप हे कोणाचें सांगा कैसें मूळ याचें १
विश्वीं भरला विश्वंभर दिसे अवघाची शंकर २
तया दुजेपणा नाहीं साक्षदेती चारी साही ३
म्हणे महादेव ब्रम्हांड उगवे एकचि मार्तंड ४

## अभंग ९०

शिवचरणीं जडलें मन झालें मिराशी उन्मन १
मग कैचें येणें जाणें सहज खुंटलें बोलणें २
षड्रिपुशीं नाहीं थारा द्वैत गेलें देशांतरा ३
म्हणे महादेव आनंद अवघा झाला ब्रम्हानंद ४

## अभंग ९१

सर्व वैराग्याचें मूळ धरी शांती ते निर्मळ १
नेत्रहीना आमंत्रण स्वयें येती दोघे जण २
ज्ञान चातुर्याची खाणी झाला धन्य तोचि प्राणी ३
म्हणे महादेव अभंग सर्व झालें उमारंग ४

## अभंग ९२

ज्ञान चातुर्य वैराग्य वसे जेथें धन्य भाग्य १
घडो त्याचें दर्शन जाऊं अनन्य शरण २
आपण तरोनी तारी जन जैसें मीनासी जीवन ३

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

महादेव म्हणे शैव तोचि एक सदाशिव ४

अभंग ९३

उपदेशिले मज ज्ञान गुरु रूपचि आपण १
पामरांशीं अधिकार दिला म्हणोनि बोले फार २
ब्रीद सांभाळावें आतां बाळां पोशी जेवी माता ३
महादेव म्हणे देवा शिवा तुमची घडो सेवा ४

अभंग ९४

ग्रंथ वाचोनिया काय तु म चे पाय अंतरले १
नाहीं घडला साधूसंग उमारंग दुरावला २
जन्मोनिया केलें काय व्यर्थ शिणविली माय ३
म्हणे महादेव अभागी नोहे मोक्षाचा विभागी ४

अभंग ९५

धन्य काशीपुरी धन्य भागीरथी गंगा
आनंदानें जाऊं पाहूं भेटूं उमारंगा १
सुर नर ब्रम्हा विष्णू मानसीं उत्कंठा
मुनि जन निशिदिनीं रतलें ध्यानी ध्याती नीळकंठा २
आनंद वन विलासी तेथें नांदतो महाराजा
भावें शरण जातां करितो रंकाचा राजा ३
एक दोन तीन चार वर्णितां शिणलें
नेतिनेति श्रुती म्हणूनि मौनाचि धरिलें ४
तारक ब्रम्ह उपदेशी तो आपणची निर्वाणीं
महादेव म्हणे स्वामी माझा तो मोक्षदानी ५

अभंग ९६

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सर्व सुखाचें भांडार तो हा पार्वतीचा वर १
गाऊं नाचूं आनंदानें पाहूं कैलासीचें केणें २
भक्तासाठीं भूमंडळ धुंडाळितो जाश्वनीळ ३
महादेव म्हणे भोळा भरो माझ्या दोन्ही डोळां ४

अभंग ९७

सुकृताचा मित्र उदय म्हणोनी पाहिलें हे पाय १
घोर तपासी नातुडे तो हा उभा दासापुढें २
उमाकांत म्हणती ज्याला तोचि भक्ताधीन झाला ३
म्हणे महादेव मिठी दृढ घालूं त्याचे कंठीं ४

॥ महादेवाचे अभंग समाप्त ॥

# ॥ श्री लक्ष्मणाचे अभंग प्रारंभ ॥

यावे यावे गणपती महाराज कृपा मूर्ती १
धाव पाव गजानना विघ्नहारका सर्वज्ञा २
आंगीं सेंदुराचि उटी केशर शोभे हो ललाटीं ३
रत्नखचित अलंकार स्वामी माझा विघ्नहार ४
लक्ष्मण गणाधीशा धाव पाव बा सर्वेशा ५

अभंग २

गुरु स्तवा गुरु स्तवा जन्म व्यथा चुके भवा १
दोषें बद्ध मुक्त झालें गुरु रायें सोडविलें २
अतिदोषी दुराचार गुरु कृपें झालें थोर ३
काळ भयाहो पासून सोडविल कृपा घन ४
माया नदीही दुस्तर येथें बुडालें हो फार ५
लक्ष्मण म्हणे बारे गुरुदेव तो काढी रे ६

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## अभंग ३

गुरु अनाथाची माय हीना दीना लावी सोय १
शरणांगताचा कैवारी भव-दुःखा तें निवारी २
लक्ष चौऱ्यांशी योनी बहु जीवाती जांचणीं ३
यास्तव गुरु तें शरण जावें अष्टभावें करून ४
मनोभावें शरण गेलें त्यातें तातें सोडवीलें ५
लक्ष्मण म्हणे मन पायीं ठेवा भक्त जन ६

## अभंग ४

तीर्थें सर्व पुण्य पायीं तुझ्या वसती अक्षयीं १
नाना मतांचा गलबला तुमचें पायीहो विराला २
नाना युक्तीचा विचार खुंटला तूं सबराभर ३
कल्पनेचें वोढंबर तूं तव कल्पने ते पर ४
तुझा अनुभव घडे तुटे कल्पना बिरडे ५
लक्ष्मण म्हणे देवा माझा सांभाळ करावा ६

## अभंग ५

गुरु वत्साला गीं माय दावीं स्वानुभव सोय १
चो देहाप्रति निसूंन दावी चिन्मात्र निर्गूण २
सद्गुरु तुमचे चरणीं ज्ञानार्जन होय मिळणी ३
मिळणी होतां तोंचि अंग भक्त होतसे निःसंग ४
निःसंगत्व हे तुनुरें स्वानंदाचा फुंद जिरे ५
लक्ष्मण म्हणे वस्तु नाहीं तीते आदी अंतु ६

## अभंग ६

गुरुभजन आहे सार अवघा मिथ्या हा बाजार १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

जग उलटें चालिलें सत्या प्रती विसरलें २
स्वभामाजीं बरळती नानापरीच्या हो युक्ती ३
गुरुभक्त सावध वागे तृप्त स्वानुभव अंगें ४
स्वानुभव सुख घेतां तुटे जन्म कर्म गुंता ५
लक्ष्मण म्हणे तात प्रेम द्यावा हो निवांत ६

अभंग ७

गुरुराव आमुचा दाता पूर्ण ब्रह्म तो रे ज्ञाता १
जीवदशेचे खंडन केलें कृपादृष्टी करून २
सत्ता प्रभूची हो थोर केलें मी तूं पणा दूर ३
निजरूपातें दाविलें सुख अक्षयीं हो दिलें ४
लक्ष्मण दीना छाया ध्यातां गुरुचीया पायां ५

अभंग ८

पूर्वींचीं तीं पापें रोगाचीया रूपें आलीं सुख रूपें भोगूं आम्हीं १
नाना पापें केलें भोगणें हें आलें देवावरी बोल काय आतां २
त्रिताप हा पाळा शरीरा भोवतां देहाचिया माथां कर्म सूत्र ३
खूण आम्हां प्रती कळली हो खरी अक्षय अंतरीं ध्यातों पाय ४
प्रभुकृपा बळ आम्हां सर्वकाळ आतां तळमळ कांहीं नाहीं ५
लक्ष्मण म्हणे स्वानंदाचा कंद शिव ब्रम्हानंद जोडला हो ६

अभंग ९

सर्पामुखीं बेडूक जाऊनी पडला म्हणे हो मजला स्थान बरवें १
शीतळ हें मुख फार सुख झालें पुढें मरण आलें तत्क्षणीं २
मत्स्य स्वादास्तव गळीं अडकला प्राणांतें मुकला गोडीस्तव ३
तैसें काळा मुखीं पडले मानव प्रपंच वैभव सत्य मानी ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

परी मूर्खांप्रती विवेक सुचेना काळाचें मानीना भय कांहीं ५
लक्ष्मण म्हणे असंख्य हो कल्प गेलें तरी ताप चुके कसा ६

## अभंग १०

गुरुराया कृपा केली भवभ्रांती निरसीली १
बैसोनियां जवळीं हात ठेवियला शिरकमळीं २
मंत्र फुंकियेला कानीं केली तत्वाची झाडणी ३
सारासार निवडिला शास्त्रीं वेदांत दाविला ४
नाना युक्ति हो करून केलें मना तें स्वाधीन ५
चौदेहा हो पासून सोडविलें कृपाघन ६
निज वस्तु तत्वातीत माझी मजला झाली प्राप्त ७
मीतूंपणा नाहीं उरी वस्तु आंतर बाहेरी ८
पाहतां पाहणें हारपलें स्मरवी स्मरणीं केलें ९
लक्ष्मणा धीर नाहीं गुरु कृपा मज देई १०

## अभंग ११

स्वामी माझा दयावंत पद दाविलें निवांत १
देहीं निधान दाविलें सुख निरुपम झालें २
परिवार झाला दीन मीतूंपणा गवसन ३
शिक्का धन्याचा तो शिरीं शोभतसे निरंतरीं ४
देहीं स्वानुभव माळ सदां शोभत निर्मळ ५
आम्हीं त्याचे वारकरी नाहीं विसर क्षणभरी ६
स्वामी आमुचा सर्वां ठायीं रितें दिसेना हो कांहीं ७
स्वामी नाहीं एक देशी प्रभु वसे सर्वांपाशीं ८
अनंत ब्रह्मांडें भरला त्याचा आधार सर्वांला ९

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

लक्ष्मणा बोलवी तो तोची सर्वांचें हृदयीं राहतो १०

अभंग १२

खळाची संगती दुःखाशीं कारण होतां अपमान मोठें दैन्य १
महत्व जातसें अपकीर्ती होत कुत्संगाची मात ऐशी आहे २
कस्तूरीचें पोतें हिंगानें नासिलें मोल कमती आलें संगतीनें ३
शिंदीवृक्षाखालीं दूधपान केलें संगानें आणिलें हीनत्वासी ४
लक्ष्मण म्हणे सुसंगती सार कीर्तीनें अंबर भरतसें ५

अभंग १३

चौसष्ट कोटी गण तुम्ही सुर तपाचे सागर महाराज १
शिवा हो समान तुमचा प्रताप प्रभू विश्वरूप वश केला २
ब्रह्मांडीचें राज्य मानोनि वमन प्रभूचें चरण सेवियले ३
तुमचा प्रताप आहे हो अपार ब्रह्मांडा आधार तुमचाची ४
क्षणीं हें ब्रह्मांड कराल घडमोडी ऐसी ताता जोडी केली तुम्ही ५
तुमचें तें सुख नाहीं ब्रह्मादिका इतरांची लेखा काय तेथें ६
लक्ष्मण म्हणे मज सुख द्यावें अक्षयीं ठेवावें दासा पायीं ७

अभंग १४

ताता बसवलिंगा प्रभूचा तूं प्राण धन्य हो प्रविण महाराजा १
तुझें प्रतापाचा काय वर्णू महिमा भक्तीची हो सीमा केली तुझी २
शिवा प्रती आम्हां स्वाधीन त्वां केलें ब्रह्मांड जिंकिलें भक्तिबळें ३
तुज ऐसा भक्त दुजा कोण शूर मायेचिया पर झालासी तूं ४
ब्रह्मांड संपत्ती करोनी उपेक्षा वश विरूपाक्षा केलासी त्वां ५
वीरशैव तुम्ही महाराज भक्त सर्वदां ध्यानस्थ शिवरूपीं ६
लक्ष्मण म्हणे मजलाही पायीं ठेवा हो अक्षयीं महाराज ७

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अभंग १५

महामाय देवी प्रभूअंगीं वसती तेथूनिया पाहसी ब्रह्मांडातें १
अनंत ब्रह्मांडें दावी लपविसी नाहीं हाललीसी ठायाहून २
तुझें हे लाघव जाणे ऐसा कोणी अगम्य करणी ज्ञानी नसे ३
योगीसिद्धमुनी सनकादी थोर तेही कृपें पार झालें तुझ्या ४
तुझ्या कृपेवीण सर्व दिसे शीण नोहे समाधान जगन्माते ५
उमादेवी माया मज दीनावरी कृपा झडकरी करी माते ६
लक्ष्मण म्हणे तुझे पादांबूज सेवी त्यांस भव-भय नाहीं ७

अभंग १६

विश्व कुटुंबाचा धनी कीर्ति तुझी गा पुराणीं १
विश्वा करसी उत्पन्न प्रेमें करिसी पालन २
शेखीं संहार करसी अंतीं एकलाच रहासी ३
पुन्हां स्वइच्छें करून करीसी ब्रह्मांड निर्माण ४
तुझे मायेचा हा खेळ माया गुणाचा गोंधळ ५
ऐसें असंख्यात घडामोडी होत जातसे तांतडी ६
कल्पे असंख्य तीं होतीं जीव सर्वदां भ्रमती ७
लक्ष्मण म्हणे नाथा पायीं ठेविसी तूं भक्ता ८

अभंग १७

स्वामी कृपा हो जहाली तत्क्षणीं भ्रांती गेली १
युक्ति प्रभुपाशीं थोर स्वामी कृपेचा भांडार २
चपळ सिद्ध गुरु देव त्यांचें अघटीत लाघव ३
केला सुखाचा सुकाळ निरसीली तळमळ ४
लक्ष्मण म्हणे मात स्वामी माझा जबरदस्त ५

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अभंग १८

लिंग पुजेचा हा त्रास मानी कुकर्मी हव्यास १
माय बापा न दे अन्न झाला दासीसी शरण २
डफगाणें प्रिय झालें अर्थ सांगे प्रेमें डोलें ३
पुराणाचा त्रास मानी कुशळाचा मुकुट मणी ४
कैफ घेउनी धुंद झाला म्हणे श्रेष्ठ मी सर्वाला ५
लक्ष्मण म्हणे एकवीस नरकीं बुडवी कुळास ६

अभंग १९

गळा शिवसूत्र त्रिपुंड्र तो भाळीं मुखीं नामावळी गाती भक्त १
रुद्राक्ष आभरणें शोभती शैवाला महारुद्र त्याला रक्षीतसे २
त्रिकाळ पूजन करिती जयजयकार ध्यान निरंतर प्रभुचेंची ३
निष्काम क्रिया होती शिवार्पण प्रभु त्या स्वाधीन वर्ततसे ४
लक्ष्मण म्हणे भक्तांची मंडळी अंगें चंद्रमौळी र क्षी त से ५

अभंग २०

बसवा त्रिअक्षरी जपा सुख होये स्वानुभव सोय सापडे हो १
ब्रह्मरूप करी स्वयें ब्रह्मानंद स्वानंदाचा कंद जोडे बाप २
मन बुद्धि चित्त लावा प्रभूपायीं सुख तें अक्षयीं देतो तात ३
शिवयोगी ध्याती बसव-लिंगाप्रती मायपाश भ्रांती तुरे तेथें ४
लक्ष्मण म्हणे ब्र ह्म रू प होती बसवलिंगा प्रती शरण गेल्या ५

अभंग २१

अहंकारें मोठे मोठेहो गोंविले प्राणी नागविलें यागें फार १
जेथें तेथें उभा पहा अहंकार अवघे अवडंबर गोंविलें हो २
माझें खरें तुझें खोटें हें चालिलें मी तूं पण आलें भेद नाना ३

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

प्राज्ञ ते पुरुष भेदांतें ग्रासून करिती भजन स्वानुभवें ४
लक्ष्मण म्हणे सर्वांचें जीवन स्वामी कृपाघन विश्वरूप ५

## अभंग २२

बाप उमाधव आमुचा धनी तयाचें चरणीं ठेवूं भाळ १
आतां नरस्तुति नाहीं करणार नाहीं दरकार कोणाची हो २
आमुच्या धन्याचे देणें सर्वांप्रती आज्ञा हो वंदिती सुरनर ३
प्रभूचिया द्वारीं पडोनि राहिलों सुखातें लाधलों स्वानुभवें ४
लक्ष्मण म्हणे शंभू ऐसा धनी नाहीं त्रिभुवनीं धुंडियल्या ५

## अभंग २३

आह्मां सुख दिसे संताचियें पायीं संतीं ते अक्षयीं समाधाना १
दयेचे आगर कृपेचें भांडार मायेचीया पर रहातात २
मताचा झगडा येथें हो मिटला स्वानंद मातला अंतर बाह्य ३
त्याची संगती आम्हासी फळली भ्रांतीही निमाली क्षणामाजीं ४
लक्ष्मण म्हणे आमुचे ते धनी अक्षय चरणीं ध्यास त्यांच्या ५

## अभंग २४

शिवयोगी तेची सूर ध्याती अक्षयीं शंकर १
राज्य ब्रह्मांड संपत्ती वमन प्राय त्या प्रती २
ऋद्धिसिद्धि चाड नाहीं सुख भोगीत अक्षयीं ३
त्याचें चरणींचें रज चरणीचे वंदीता हे यमराज ४
लक्ष्मण म्हणे बाप हरतो भवव्यथा ताप ५

## अभंग २५

योगी पावन मनाचा ग्रास केला त्रिगुणाचा १
परी चार सर्व पाही स्वसुखांत अक्षयीं २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मीतूंपणातें सोडून ध्याती शिव पंचानन ३
लक्ष्मण म्हणे याचे पाय ध्यातां दुःख कैचें ४

अभंग २६

अनंत ब्रह्मांडें क्षणे घडी मोडी तो धावे आवडी धत्तुर पुष्पा १
देव म्हणती ऐक नवल परी आम्हा मदनारी वश्य नोहे २
भक्तातें भाळून नेणें उच्च नीच नीचाचें ही नीच कार्य करी ३
त्याचें वर्म कोणाप्रती ही कळेना भक्त त्याच्या खूणा जाणती हो ४
लक्ष्मण म्हणे महाराज तात भक्तानें अंकित केलें देवा ५

अभंग २७

ब्रह्मीं नाहीं माया बंड ब्रह्म सर्वदां अखंड १
पुरुषा अंगीं जैसी छाया तैसी ब्रह्मी असे माया २
जेवीं सूर्य रश्मीजळ सूर्यसत्तें काळ वेळ ३
परी तो आहे हो निवांत ब्रम्हीं नाहीं आदी अंत ४
लक्ष्मण म्हणे त्यातें नानापरी स्तविती मतें ५

अभंग २८

ब्रह्मा नाहीं मतवाद ब्रह्म सर्वदां अभेद १
भेदभाव हा मायेचा झाला गलबला वाचेंचा २
अनिर्वाच्य वस्तु आहे भेद मतें वश नोहे ३
मी तू जेव्हां मागें सरें तेव्हां ब्रह्म दिसे खरें ४
लक्ष्मण म्हणे समबुद्धी होता साधे ही उपाधी ५

अभंग २९

शिवनाम हें प्रचंड निरसी अविद्येचें बंड १
प्राशनमात्रें होय तृप्ती हरे तमभय भ्रांति २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नाम महिमा अपार घेती ब्रह्मादि सुरवर ३
लक्ष्मण म्हणे नाम जाण महिमा पुरुषोत्तम ४

अभंग ३०

धेनुजैसी हुं ब र तीं वत्सा प्रीतीनें चाटीती १
दुग्ध पाजी तृप्त करी अती प्रेमा त्याचा धरी २
तैसा महादेव धनी भक्तालागीं ये धाऊनीं ३
कु र वा ळी वारंवार अति प्रेमा भक्तावर ४
लक्ष्मण म्हणे ताता करी आपणां ऐसें भक्तां ५

अभंग ३१

शंकर हें नाम सुखाचें सदन भवबाधा जाण चुके येणें १
भ्रांतीचा पडदा शिवकृपें निघे मग ते अवघे समाधान २
प्राज्ञ जे पुरुष अहो रात्रंदिन करिती भजन सदोदित ३
लक्ष्मण म्हणे शिवनामसार ध्याता सुखापार नाहीं जाणा ४

अभंग ३२

शिव नाम अग्नि पाप तें अरण्य जाळितों कारुण्य महिमा मोठा १
स्वर्गींचें अमृत फिकें नामापुढें विश्वनाथ जोडे नाम स्मरता २
स्वर्गींचें अमृत कल्पांती हो नाश नाम अविनाश असे सदा ३
लक्ष्मण म्हणे भाग्यवंत नर घेती नामसार ब्र ह्मा नं दें ४

अभंग ३३

देशाधिपती झाला रा जे श्व र वै भ वें शंकर भेटेना हो १
भक्त असो कैसा दरिद्री तो ऋक्ष त्यातें विरूपाक्ष भेट देतो २
भवा भक्ति प्रिय दुजे प्रिय नाहीं कुळ गोत्र कांहीं नलगे त्यातें ३
लक्ष्मण म्हणे निष्काम ते भक्त सर्वदा ध्यानस्थ शि व ना मीं ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## अभंग ३४

बोलका हो झाला जगीं तो विख्यात नाना तर्क अर्थ जाणतसे १
जाणिवेचा स्फुंद साठवेना पोटीं सांगतसे गोष्टी ज्ञानाच्याहो २
परि तो बोलका वर्म तें वेगळें स्वानुभवें कळे गुरुकृपें ३
जेव्हां तो अहंकार जाणिवातें विरे तेव्हां बापा खरें सुख होय ४
लक्ष्मण म्हणे प्रचितीचे संत सुख तें निवांत घेती बापा ५

## अभंग ३५

भस्माचा महिमा असे श्रेष्ठ थोर भस्म निरंतर शिवा प्रिय १
सर्व पूत भस्म मंत्रें सर्व क्रिया भस्म सर्व कार्यां प्रधान हो २
सनकादिक योगी भस्म चर्चितातो सर्वत्रा हो प्रती भस्म वंद्य ३
भस्म धारणेनें फार उद्धरिले पुराणीं वर्णिलें व्यास देवें ४
लक्ष्मण म्हणे वामदेव मुक्त तोही भस्मसूक्त वर्णितसे ५

## अभंग ३६

विभूति महिमा अगाध पुराणीं आहे व्यासवाणी प्रसिद्ध हो १
जप तप यज्ञ श्राद्ध क्रिया नेम सर्वां ठायीं भस्म शोभतसे २
अती दोषी खळ भस्में उद्धरिलें शिवसभें गेले मुक्तिलागीं ३
भस्मधारी प्राणी शिवाप्रती प्रिय भस्म योगी रायें श्रेष्ठ केलें ४
लक्ष्मण म्हणे शिवभक्त थोर भस्म निरंतर लावितात ५

## अभंग ३७

रुद्राक्ष महिमा पुराणीं प्रसिद्ध वेद सिद्ध शुद्ध वर्णिताती १
रुद्राक्ष हा रुद्ररूप हो म्हणून करिती धारण श्रेष्ठ श्रेष्ठ २
अहो वीरशैव त्यातें हें भूषण योगी पुरातन रुद्रभक्त ३
भस्म ते रुद्राक्ष करीती धारण शिवातें अर्चन करिती नेमें ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

लक्ष्मण ह्मणे शिवयोग श्रेष्ठ असे एकनिष्ठ लिंगपूजा ५

अभंग ३८

लिंगमहिमा श्रेष्ठ वेद हो वर्णिती लिंग सर्वांप्रती अगोचर १
अनंत ब्रह्मांड माया हा पसारा लिंगाठायीं सारा होय जाय २
ब्रह्मा विष्णु इंद्र दिक्पाळ सुरवर लिंग प्रेमभरें पूजिताती ३
लिंग महिमा श्रेष्ठ व्यासें वर्णियला लिंग सर्वत्राला वंद्य होय ४
लक्ष्मण म्हणे लिंग हो पुराणीं अद्भुत शिराणी महिमा असें ५

अभंग ३९

जंगम महिमा वायू पुराणांत सांगतसे सूत ऋषिलागीं १
जंगम स्वरूप अनादी संचले त्याचें सत्ते चाले सर्वत्र हें २
जगींहो भरलें जंगम स्वरूप अलक्ष अमूप ब्रह्म तेची ३
तोचि हा सगुण साकार प्रत्यक्ष भक्ता सर्व साक्ष भासतसे ४
लक्ष्मण म्हणे जंगम अनादी स्तवा कृपानिधी शुद्ध भावें ५

अभंग ४०

गुरु तीर्थ महिमा अगाध पुराणीं देव श्रेष्ठ तीन्ही त्या हो प्रिय १
वेद सिद्ध मुनी अवतार प्रसिद्ध तेही सद्गद वंदितात २
चिन्मात्र तें तीर्थ सर्वांचें जीवन घेती विद्वज्जन महाशूर ३
वस्तु भेदातीत आहे हो निवांत तेथें हो किंचित भेद नाहीं ४
मतांचा गलबला निमाली ती वस्तु स्वानंद भरी तूं स्वामी माझा ५
लक्ष्मण म्हणे आमुचें जीवन तेथेंचि निमग्न झालों आम्ही ६

अभंग ४१

कूळ तें पवित्र शिव भक्त वंशी पावन जगासी करितसे १
देश तो पवित्र करी कृपें करून शिव पंचानन सखा ज्याचा २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भक्ताचा महिमा अगम्य अपार ब्रह्मादिका पार न कळेचि ३
निजानंद रूपीं रंगले ते भक्त सर्वदा निवांत प्रभू पायीं ४
लक्ष्मण म्हणे शिवभक्त थोर ब्रह्मांडा आधार त्याचाची हो ५

अभंग ४२

शिव हर हर मुखीं हो उच्चार आवडे व्यवहार हाची आम्हां १
प्रभु पाय हेंची आमुचें हो धन धन्य तें जीवन आमुचें हो २
धन लोभी आम्हीं विसरून धना स्वानंद जीवना विश्वनाथा ३
लक्ष्मण म्हणे अक्षयीं हें धन बाह्य सुख हीन मिथ्या माय ४

अभंग ४३

जेथें तेथें तुझी बारे दिसे भासे ही मायारे १
नाना वर्ण नाना व्यक्ति सर्व मायेची संपत्ती २
रंग रूपातीत तुरे आधीं मधीं अंतीं बारे ३
स्वयं ब्रह्म तूं एकला भास मायेनें हो केला ४
सत्ता प्रभू तुझी थोर करी माया ती व्यवहार ५
लक्ष्मण म्हणे हें सूत्र हालें इच्छें तूं स्वतंत्र ६

अभंग ४४

शिव भक्ति हो करून भक्त गेले उद्धरून १
अलक्ष पूर तें कैलास तेथें केला भक्तें वास २
पायीं राहिले अक्षयीं येणें जाणें तया नाहीं ३
निजकार्य हें साधिलें परब्रह्मीं हो रतलें ४
लक्ष्मण म्हणे त्याणीं वश केला शूळपाणीं ५

अभंग ४५

लिंग आमुचें जीवन लिंग ब्रह्म सनातन १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

लिंग पूजन सर्वांसी ब्रह्मा विष्णू त्या रुद्रासी २
लिंग ध्यानीं सदोदीत स्वानुभवें हो निवांत ३
लिंग अगोचर सर्वां सुर नरा त्या मानवा ४
लक्ष्मण म्हणे लिंग सदां सर्वदां अ भं ग ५

## अभंग ४६

लिंग आमुचा हो प्राण प्रेमें करितों पू ज न १
हृदयीं वसे तें निर्मळ लिंग सर्वदा अ च ळ २
बाह्य लिंगाचा प्रकाश लिंग सदा अविनाश ३
लिंग स्वानंद जीवन ब्रह्म सत्ते प रि पू र्ण ४
अलक्ष लिंग मायातीत इष्टलिंग तें नि वां त ५
लक्ष्मण विनवी बारे ब्रह्मादिक स्तविती त्यारे ६

## अभंग ४७

लिंग हृदयीं असून त्यातें गेलें विसरून १
बाह्य करिती पूजन नेणोनिया निज जन २
लिंग महिमा नेणती म्हणोनिया ते भ्रमती ३
इष्ट लिं ग पू जे वी ण नोहे कदां समाधान ४
लक्ष्मण म्हणे ध्यायीं इष्ट लिंगातें अक्षयीं ५

## अभंग ४८

अहो ब्रह्मांड पसारा लिंग इच्छेचा हो सारा १
लिंग इच्छा माया गुण माया लाघवी दारुण २
दृष्टि ब्रह्मांड दाखवी क्षणें माया ती लपवी ३
लिंग सत्ता त्या मायेची लिंगीं अगोचरी साची ४
ल क्ष्म ण म्हणे लिंग स्मरा करी भवभंग ५

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

0155,1J60X K5



अभंग ४९

सूर्याअंगीं जेवीं किरण तेवीं लिंगीं माया गुण १
दीपामाजी तेज ज्योती तैशी माया असे स्फूर्ति २
वृत्ती निवृत्तीच्या पर लिंग स्वयंभू आकार ३
क्षरलें हें माया गुण स्वयं प्रकाशलें पूर्ण ४
लक्ष्मणा वाचें बोलवी तेंचि जाणीव करवी ५

अभंग ५०

तुज पहातां न य नीं मीतूंपणा होय हानी १
होय सुखाचा सुकाळ शिवब्रह्म तूं निर्मळ २
तीन पांच सहा बारे होती सुखी सर्वत्र रे ३
शिव आनंदाची खाणी महाराज शू ळ पा णी ४
ल क्ष्म ण म्हणे शीर तुझे पायीं निरंतर ५

अभंग ५१

आम्हां हीनमुखेंकरून बोलविसी तूं वचन १
केवळ दोषाचा सागर अती अन्यायी पामर २
मज ऐसा दोषी देवा नाहीं त्रिभुवनीं शिवा ३
परी तूं हृदयीं वसोन वदविसी आपुले गुण ४
लक्ष्मण अ वि चा री निमित्ताचा अधिकारी ५

अभंग ५२

भक्तवाणी सत्य करी भक्त त्रासा नोव्हे दुरीं १
भक्त जेथें अवलोकी तेथें उभा तूं पिनाकी २
तूं आहेस भक्ताधीन करी भक्ताचें र क्ष ण ३
लक्ष्मण म्हणे हो देवा भक्त तुमचा विसावा ४

SRI JAGADGURU VISHWARADHYA JNANA SIMHASAN JNANAMANDIR LIBRARY, Jangamwadi Math, VARANASI, Acc. No. ... 035

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## अभंग ५३

तूंच स्वतंत्र नो हे सी भक्ता स्वाधीन असशी १
अनंत कोटी ब्रम्हांड तुझीया रोमीं अखंडें २
ऐसा तूं रे पु रा त न महाराज पं चा न न ३
भक्तें हृदयीं तुजला सांठविला हो स्नेहाळा ४
लक्ष्मण म्हणे भक्ता आम्हां मानसी तूं आतां ५

## अभंग ५४

जाती कुळ गोत्र न पाहे शंकर भक्ताचें माहेर स्वामी माझा १
भक्ता वांचुनी दुजे प्रिय नाहीं अनाथाची आई स्वामी माझा २
त्यातें वेगीं स्तवा कराहो सार्थक सुख हें अनेक ना श वं त ३
येथें गुंतूं नका करा हो सोयरा कृपेच्या भांडारा भक्ती प्रिया ४
लक्ष्मण म्हणे स्वामी सखा करा वाया येरझारा कांहो करितां ५

## अभंग ५५

थोरघर हो पाहून आलों देई भिक्षादान १
भिक्षा वाढी हो वेगेसी कांहो विलंब लावीसी २
श्रेष्ठ तुम्हीं दानशूर आम्हां विषयीं निष्ठूर ३
अंदा धुंद कारखाना दिसतसे पंचानना ४
लक्ष्मण हा भिकारी उभा केव्हांचा द्वा रीं ५

## अभंग ५६

द्वारीं बैसलों ति ष्ठ त कैसें तुजला उचित १
फार झाल्या येरझारा कोठें मिळेनाहो थारा २
दानशूराचें ल क्ष ण ऐसें नोहे नोहे जाण ३
येतां याचक द्वा रां त पुरवावे म नो र थ ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

लक्ष्मण म्हणे शिवा मज घडो नित्य सेवा ५

अभंग ५७

कोठवरी हो तिष्ठावें काय तुजला म्हणावें १
काय झालासी तूं दीन तरी लपवी वदन २
उदारत्व गेलें म्हण आम्हीं जातों परतून ३
फार होईल अपकीर्ति बारें विचारावें चित्तीं ४
लक्ष्मण म्हणे देवा भवभयातें चुकवा ५

अभंग ५८

उदार तो शंभू राव ऐसा बोले शाचिधव १
दयाळू हो पशुपती मोठे मोठे ते बोलती २
आम्हां विषयीं कृपण कैसें तुझें थोरपण ३
भिक्षा हेची मागतो हो पाय वेगीं दाखवी हो ४
लक्ष्मण म्हणे शिवा वेगीं आपुला म्हणावा ५

अभंग ५९

शंभो ऐसा भोळा नाहीं कोणी देव फार कृपाळू स्वामी माझा १
दीप सरसावला केला तो कुबेर अति दुराचार प्राणी होता २
ऐसीं हो अपार उद्धरीलें कुष्टे माझ्या कृपा श्रेष्ठ किती सांगू ३
पत्र पुष्पें करून होतसे प्रसन्न भक्ताचें जीवन परात्पर ४
लक्ष्मण म्हणे कराकीं हो भक्ती भक्तीची हो मुक्ती दासी होय ५

अभंग ६०

वेद शास्त्र श्रेष्ठ सर्वही सांगती करावी हो भक्ति प्रेमयुक्त १
प्रेमळ तो भक्त फार प्रिय देवा दुजे महादेवा प्रिय नाहीं २
प्रेमळ भक्तांचें किंचीत जीवन तेणें पंचानन संतुष्ट हो ३

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

प्रेमयुक्त वेगीं कराहो पूजन तुटतें बंधन अ वि द्ये चें ४
लक्ष्मण म्हणे प्रेमळाचा सखा स्वामी पाठी राखा माझा शिव ५

अभंग ६१

थोराची चाकरी करी तो सर्वदा दुजा मज धंदा आ व डे ना १
न मागतां देतो मु शा रा चुकता कोठेंही न्यूनता पडेना हो २
आतां दुजियाची कासया चाकरी करूं त्रिपुरारी स्वामी एक ३
स्वानंदा मुशारा पावलो भरून प्रभु पंचानन सखा केला ४
लक्ष्मण म्हणे ऐसा यजमान दुजा असें कोण दाखवा हो ५

अभंग ६२

जटा भार नको टीळा माळ टोपी असावें स्वरूपीं स मा धा न १
जिव्हां सिश्न दोन्ही असावी स्वाधीन नसावा अभिमान सर्वा भूतीं २
अरण्याचा वास नलगे सायास दयाळू महेश भेट देतो ३
शिव नाम प्रेमें वाचें उ च्चा रा वें मन तें करावें पायीं स्थीर ४
लक्ष्मण म्हणे शिव नाम सार घेतां उ मा व र तुष्ट होय ५

अभंग ६३

धन्य धन्य गंगा त्रीताप नाशनी सिद्ध योगी मुनी इच्छी स्नान १
शिवाचें मुगुटीं तुझा असें वास उभय रो गा स मात्रा तुगे २
पातकीं हे जन पतीतगे खळ मातें तूं निर्मळ करी त्यातें ३
फार तुझे स्नानें झालेगे पावन अमरादी सुर गण युगायुगीं ४
लक्ष्मण म्हणे तुला मी श र ण दीनातें पा व न करी माय ५

अभंग ६४

वासना हें बेट झालें असें भारी गुंतू त्रि पु रा री येथें देवा १
जन्मासी कारण वासना ही मूळ सदां ख ळ ख ळ जन्म खेपा २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बेट हें खणून करीबा सपाट दाखवावी वाट माय बापा ३
तुजवीण कार्य कदां ही होईना प्रभु त्रि न य ना येई वेगें ४
लक्ष्मण म्हणे पडलो गुंतून ह्यांतून ओढून काढा मज ५

अभंग ६५

सुखें संसारी वर्तावें परी शिवातें स्मरावें १
मूळ धरूनी चालावें जगीं विश्वरूपा गावें २
नका अरण्याचा वास नलगे योग अभ्यास ३
सर्व पुराणें सां ग ती नाम श्रेष्ठ सर्वा--प्रती ४
कलि युगीं नामावीण नसें दुजे हो साधन ५
ल क्ष्म ण म्हणे सार नाम गाती सुरासुर ६

अभंग ६६

कर्म भ्रष्टाचें द ह न करी नाम अग्नीहून १
पर्वता तुल्य पातक जळे शिवनामीं देख २
चित्त बुद्धि हो निरसून दिसे अद्वैत उन्मन ३
ऐसा नामाचा महिमा न वर्णवें वे दा ग मा ४
लक्ष्मण म्हणे शिव देतो आपुलें वैभव ५

अभंग ६७

देवा फार युग गेलें नाहीं भ्रमण चुकलें १
शीण अंगीं आला फार कांहीं सुचेना विचार २
फार झाल्या येरझारा पाय दाखवी शंकरा ३
आतां त्वरें देवा यावें दी ना प्र ती सोडवावें ४
ल क्ष्म ण म्हणे सोय करी वेगीं दावी पाय ५

अभंग ६८

धांव धांव गंगाधरा भक्त वत्सला शंकरा १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तुजवीण हो गमेना भेटी द्यावी कृपाघना २
जीवनाविणें मासोळी तैसा जीव तळमळी ३
तैसा देवा तुजवीण माझा जाऊं पाहे प्राण ४
अंत पाहूं नको आतां भेटी द्यावी कृपावंता ५
ल क्ष्म ण म्हणे ज्ञान तुज प्रिय नसे जाण ६

## अभंग ६९

माय बाप धन तूंची तूंची माऊली आमुची १
आप्त कुळ गण गोत तूंची आराध्य दैवत २
तूंची गुरू गा शंकरा दीनानाथा वि श्वं भ रा ३
अवघा तूंची तूं सर्व तूंची प्राणपती शिव ४
कोण पदार्थं उ प मा तुम्हा द्यावी सर्वोत्तमा ५
लक्ष्मणा बो ल वे ना कांहीं स्तवन सुचेना ६

## अभंग ७०

परात्परा तूं शं क रा शुद्ध बुध नि रं त रा १
शुद्ध ब्रह्म तूं निःसंगा काम दहना अभंगा २
सगुण भक्ता लागीं माता झालासी हो उ मा कां ता ३
माया गुणें नाना क्रीडा क री तो सी चंद्रचूडा ४
प्र भू स त्ता तुझी थोर मूळ बीज तूं ओंकार ५
लक्ष्मण म्हणे शिवा सर्व तूंची म हा दे वा ६

## अभंग ७१

देवा शूळपाणी येई अती त्वरें सदया धांव रे गंगाधरा १
तुजवांचुनीयां गमेना मजला ब्रह्मां डरे रक्षका म हा दे वा २
पाय दाखवी हो तेणें समाधान कृपाळू आपण अहा देवा ३

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ल क्ष्म ण म्हणे वृषभवाहना सुखाचें स द ना विरूपाक्षा ४

अभंग ७२

नाम मुखीं नाहीं पशू तोची प्राणी गुंतला व्यसनीं मूर्ख जाणा १
धिग् त्याचें जिणें धिग् तो व्यवहार प्रभू गं गा ध र आठवेना २
लक्ष चौऱ्यांशी दुःख त्या चुकेना नीच योनीं नाना कष्ट भोगी ३
लक्ष्मण म्हणे नसावा तो संग साधुतें निःसंग प द दे ती ४

अभंग ७३

परपुरुषाशीं सांठवातें मनीं मज त्या वांचूनी गमेना हो १
त्यानें माझें मन नेलेंहो हिरोन अगम्या कारण तोची आहे २
कांहीं आतां मज बोला लाज गेली त्या भक्तीनें नेली बुद्धी माझी ३
लक्ष्मण म्हणे होणार चु के ना कैलासीचा राणा सखा आहे ४

अभंग ७४

प र ब्र ह्म उ मा प ती माझी परिसा विनंती १
कर जोडीतों दुबळा स्वामी ब्रह्मांडाच्या पाळा २
कीर्तनीं रंग वेडि भरी आतां येईगा लवकरी ३
आपण असावें जवळी दीनबंधु चं द्र मौ ळी ४
ल क्ष्म णा चें जी व न प्रभु आहा हो आपण ५

अभंग ७५

शंभो पहा हो वे गे सी भवरोगातें तो नाशी १
नका गुंतूं त्या व्यवहारीं फार बुडाले सं सा रीं २
येथील आप्त पुत्र धन सर्व मायेचें मं ड न ३
स्व प्र व त सुख खरें बरवे मनी विचारारे ४
ल क्ष्म ण म्हणे नाथ करी अनाथास नाथ ५

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## अभंग ७६

रूप पहा हो सगुण निज भक्ताचें जीवन १
पंचवदन विरूपाक्ष शिव ब्रह्मांडीचा अध्यक्ष २
वाराणसी पुण्य क्षेत्र प्रभू शोभला त्रिनेत्र ३
वेगीं द्यावें त्या दर्शना स्वामी पतीत पावना ४
लक्ष्मण म्हणे बापा हारी भव व्यथा तापा ५

## अभंग ७७

तुज पहातां शंकरा सुख झालें विश्वंभरा १
झाला सुखाचा सुकाळ दुःख गेलें हें सकळ २
मी तूं पणा बोळवण तूंची सर्वांसी कारण ३
अंतर बाह्य पंचवदन अवघा भास परिपूर्ण ४
लक्ष्मण म्हणे भाव करूनी अलिप्त तूं देव ५

## अभंग ७८

घरच्या उजेड चोरातें अंधार नेणें दीप बारे भिन्नभाव १
तैसें योगेश्वर समबुद्धि प्राणी भेदा भेद स्वप्नीं नेणती हो २
तयाचें दर्शना सुख होय जीवा प्राज्ञ ते मानवा मुक्त करी ३
त्रयदेव ज्याचें करिती पूजन अष्टभावें करून प्रेम युक्त ४
लक्ष्मण म्हणे दयेचे आगर कृपेचें भांडार महाराज ५

## अभंग ७९

शिव शिव प्रेमें स्मरा तेणें चुके येरझारा १
तापत्रयाचें खंडन होतसे हो कल्याण २
नामीं ठेवूनी विश्वास ठेवा चित्तीं निजध्यास ३
त्याचे कृपें सुख होय दयाळू तो शंभूराय ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नामीं तरले हो हीन श्रेष्ठ नामाचें महिमान ५
लक्ष्मण म्हणे प्राप्ती सद्भक्तीनें मिळे मुक्ती ६

अभंग ८०

जी जी उपमा हो द्यावी ती ती शोभे महादेवीं १
निरुपम तूं शंकर माया गुणाचेया पर २
तुझें कर्तृत्व कळेना परात्परा निरंजना ३
भक्तावर कृपा कर ठेविसी तूं निरंतर ४
निर्गुण ब्रह्म साकार भक्तालागीं अवतार ५
लक्ष्मणा पाय दावी दीन अनाथ म्हणवी ६

अभंग ८१

दीप प्रकाशांत सर्वत्र वर्तती परी तो कर्मांप्रती लिप्त नाहीं १
तैसा आम्हां देहीं अलीप्त सर्वदां त्यातें भवबाधा आतळेना २
सर्व त्याचे सत्ते परी तो वेगळा मळ त्या निर्मळा लागीं नाहीं ३
लक्ष्मण म्हणे माया गुणातीत योगी तो निवांत लक्षीतसे ४

अभंग ८२

एकची तें पाणी उसा मिरच्यातें एक तीक्ष्ण तें एक गोड १
सर्व वनस्पतीमुळीं पाणी एक भेद ते अनेक झाले नाना २
सर्पामुखीं विष शुक्तिगर्भी मोतीं नानापरी व्यक्ती पाणी एक ३
तैसा आत्मा सर्वांघटीं एक वसे प्रकृतीनें दिसे भिन्न भेद ४
लक्ष्मण म्हणे हें स्थानाचें महत्व भक्तिभावें तत्व ओळखावें ५

अभंग ८३

तुझें स्वरूप आकाश सर्व काळ अविनाश १
तेथें मज वास देई मज दीनाचिया आई २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

जैसी सागरीं सरिता तैसें करी आतां ३
दीपा कर्पुराचे परी करी मज झडकरी ४
लवण सागरा भेटी होतां नोहे कदां तुटी ५
लक्ष्मणा पढवून प्रेमें करवा भजन ६

अभंग ८४

देवा आलों लोटांगणीं करा छाया कृपादानीं १
कामांतका नम्र झालों व्यर्थ संसारीं शिणलों २
तुजवीण नाहीं वाली आम्हा त्राता अंतःकालीं ३
सुस्वरूप निरंतर तुझे सेवेशी सादर ४
लक्ष्मण झाला लंड पडे द्वारीं हो अखंड ५

अभंग ८५

राजरंक असो महंत संन्यासी काळ तो सर्वांसी भक्षीतसे १
स्त्री पुत्र आप्तहो सोयरें सज्जन प्राणी सुख पूर्ण हेंची मानीं २
प्राणी येथेंची हो फार सुखावले मुद्दल चुकलें स्मर नाहीं ३
काळाची हो धाड आली अकस्मात भक्षीला क्षणांत हीनबुद्धी ४
यम त्या यातना दुःख भोगी फार दुःखाचा सागर भरलासे ५
लक्ष्मण म्हणे पुन्हा गर्भवास तेथील दुःखास पार नाहीं ६

अभंग ८६

हरि लोळे पायावरी इतरांची काय थोरी १
त्याचे सर्व आज्ञाधार सर्वां वंद्य तो शंकर २
योगियाचा मुगुटमणी पूर्ण ब्रह्म शूळपाणी ३
ज्याचें नाम घेतां वाचें गिरी जळे पातकाचे ४
त्यासी विसरले नर विषयीं गुंतले अपार ५

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

लक्ष्मण म्हणे तारी स्मरा दीनाचा कैवारी ६

अभंग ८७

काशी यात्रेतें हो गेला जातां मार्गीं घाला झाला १
कर्महीन होतां काळ गेला पंचकोशीं खळ २
मार्गीं जातां वेश्या जाण फार पाहिली लावण्य ३
विश्वनाथा विसरला तीशीं रमोनी राहिला ४
द्रव्य सरे तों डावर मारी करी तया दूर ५
तैसा सिद्धीचा पसारा भ्रष्टविती योगेश्वरा ६
लक्ष्मण म्हणे भक्त प्रभुपायीं हो निवांत ७

अभंग ८८

मळ या निर्मळा लावितां लागेना गगन भिजेना उदकीं तें १
अग्नीमाजी काष्ट नांवाजे पडति अग्नीरूप होती काष्ट नुरे २
तैंसे निजध्यासें जीवनमुक्त होती ब्रह्मानंद प्राप्ती होय जेव्हां ३
निजध्यास त्याचा सर्वदां असावा स्वानंद विसावा घ्यावा तेथें ४
लक्ष्मण म्हणे निर्मळाचा संग होतां नुरे अंग अविद्येचें ५

अभंग ८९

फिरोनीया पहातां नुरे संसार ब्रह्मरूप सारे आपणची १
रज्जुचा तो भास जैसा होय बारे तैसा प्रपंच रे भास रूप २
भास हा सरता सर्पत्व तें नुरें रज्जु हेंची खरें मानी मना ३
तैसें कल्पनेचें निघतां पडळ ब्रह्मची केवळ निज वस्तु ४
लक्ष्मण म्हणे मी तूं हें कपट उघडे निकट ब्रह्मची हो ५

अभंग ९०

सर्वत्र हें ज्ञान पोट भरायाचें परी तें सुटकेचें वेगळे हो १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वेदशास्त्र जरी केले पाठांतर ज्योतीष तें सार सांगे लोकां २
सिद्धी जरी झाल्या स्वाधीन त्या बारे त्रैलोक्याचें सारें कळे वर्म ३
नाना चमत्कार दाखविती तुर्ती सर्वांमाजी कीर्ती झाली मोठी ४
स्वानुभव ज्ञान जेणें नाहीं झालें तों वरी फोल सर्वत्र हें ५
लक्ष्मण म्हणे येणें जाणे जरी चुकवावें तरी ज्ञान खरें ६

## अभंग ९१

शिव महिमा अफाट गाती अष्टावीस भाट १
सकळ ध्याती हो शिवाला सर्वां वंद्य शिव झाला २
सुर अज्ञेनें वर्तती भाळीं रजातें वंदिती ३
भक्ति सुख भक्तापाशीं गर्भ चुके चौऱ्यांऐंशीं ४
तुमचें लाघव कळेना परात्परा निरंजना ५
लक्ष्मण म्हणे देवा तारी तारी आम्हां भवा ६

## अभंग ९२

गुरु देवा तूं अमर वससी हो सर्वांठायीं १
सर्वज्ञा तें तूंही सम वसे हृदयीं आत्माराम २
तुझे सत्ते करून चेष्टे त्रैलोक्यालागून ३
तूंची आधार विश्वाचा तूंची स्वामी हा सर्वांचा ४
एकाएकीं तूं एकला दृश्य मायेलागीं झाला ५
लक्ष्मणाचें जीवन गुरु रूप सदा ध्यान ६

## अभंग ९३

अहो बहु बळी गेले राजे छत्रपती नेले १
अनंतयुगाचा तो काळ भक्षीतसे देहा सकळ २
आकारातें जितुकें आलें तितुकें काळानें भक्षिलें ३

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पुण्यवंताच्या हो कीर्ती पापी गेले अ धो ग ती ४
कांहीं कीर्ती मही राहो ऐसा देह झि ज वा हो ५
ल क्ष्म ण म्हणे भक्ति पापा जाळी पुण्या देती ६

## अभंग ९४

विश्वनाथ असे धनी कैसे वि स र ले प्राणी १
करी नीचाची ही सेवा विसरले खऱ्या देवा २
काय करी मुर्ख झाला माया अविद्येचा घाला ३
विषयीं गुंतला म्हणून दुःख भोगितो दारुण ४
खरें नाणें हो चुकलें खोटें फार प्रिय झालें ५
ल क्ष्म ण म्हणे भक्ती दृढ केल्या चुके भ्रांती ६

## अभंग ९५

पाप ताप दैन्य हरे प्रेमयुक्त नाम घ्यारे १
शिवनाम हो कल्याण करी भक्ताचें पालन २
नाम शि वा चें हृदयीं गाती शैव तें अक्षयीं ३
ल क्ष्म ण म्हणे धालों शिवकृपें मुक्त झालों ४

## अभंग ९६

पत्र पुष्प आणि जळ तेणें तृप्त जाश्वनीळ १
शुद्ध भावाचा भुकेला सखा भाविकाचा झाला २
व्याध कुळीं जाती हीन त्यातें केलें हो पावन ३
दारा पुत्राहुनी थोर अति प्रिय भ क्ता व र ४
ल क्ष्म ण म्हणे भवा प्रेमें पूजा महादेवा ५

## अभंग ९७

शिवयोगी तेची जाणा ध्याती अक्षयीं ईशाना १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

राज्य ब्रह्मांड संपत्ती भोगे तया अधोगती २
ऋद्धी सिद्धी चाड नाहीं स्वइच्छें वि च रे म ही ३
त्याचें च र णी चें रज वंदीतसे क रां बु जें ४
ल क्ष्म णा चें तळमळ गेला जन्म ग्रासी काळ ५

## अभंग ९८

कूल तें पवित्र वीरशैव वंशी पावन ज गा सी करितसे १
जन्मा आधी लिंग गर्भांत धारण शिवपंचानन सखा ज्याचा २
लिंगरूपी ब्रह्म शिव सनातन पवित्र पा व न वेद वाक्य ३
धारण स्मरण पूजेचें विधान असें आचरण स्त्रिया पुत्रा ४
गुरुमुखीं मंत्र देहीं ती प्रतिष्ठा असे एक निष्ठा युगायुगीं ५
लक्ष्मण म्हणे दृढ उपासना नसे अन्य जाणा धर्मामाजी ६

## अभंग ९९

लिंगा पासूनिया उत्पन्न जें झालें अंती लया गेलें लिंगरूपीं १
लिंग असे ब्रह्म शिव पंचमुख उभय प्रेक्षक ज गा मा जी २
येणें जाणें स्थला ठेवा आठवण मत-अभिमान धरूं नका ३
देह धारणेला लिंग हें धारण पूर्ण आठवण येणें राहे ४
म्हणूनिया ओघ चालला अचाट धर्मशास्त्र वाट दा ख वि ली ५
लक्ष्मण म्हणे वीरशैव धर्म आगमीं हें वर्म सांगे शिव ६

## अभंग १००

परब्रम्हरूप शिव अ वि ना श असें सा व का श सदोदित १
ॐकारा पासून ध्वनी प्राप्त झाली माया तीच बोली वेदागम २
ॐकारी हे पंच प्रवण असती साह्य ते करती ए क मे कां ३
प्रथम तारक दुजें दंडाकार युग्म आरुवार कुं ड ल तें ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अर्ध चंद्र शोभा चतुर्थ संपूर्ण बिंदु वर्णावर्ण पं च ब्र ह्म ५
पंचब्रह्म जाण निर्गूण असती सगुण ते होता सृष्टिकर्मा ६
लक्ष्मण म्हणे पाहीलें स्वरूप पहा सुखरूप मूळ मंत्रा ७

## अभंग १०१

पंचब्रह्म पंच मुख झाला सगुण तो देव १
पंच तत्वाचा उद्भव एका ॐकारा पासाव २
शिवशक्ति प्र ग टू न केलीं तत्वें हीं निर्माण ३
पृथ्वी आप तेज जाणा वायआकाशाच्या खुणा ४
त त्व वे त्ते हो म्हणती होतो क्रमें लया जाती ५
ल क्ष्म ण सांगे गुज शब्द आकाशाचें बीज ६

## अभंग १०२

शिव शक्ति एक्यामते केलें उत्पन्न ब्र ह्म यातें १
कर जोडोनियां ब्रह्मा नमी साष्टांगी त्या ब्रह्मा २
शिव आज्ञा सृष्टि करी विष्णु उत्पन्न त्या परी ३
रुद्र यम अ व ता र करी सृ ष्टी चा संहार ४
ब्रह्मा म्हणे सृष्टि ज्ञान मज सां गा वें आपण ५
शिव असे पं च मु ख ब्रह्मा ति तु कें ची देख ६
पं च मु खें पं च वे द सांग करी मु खो द्गत ७
अंतीं नाहीं उ म ज ले तेणें ब्रह्मा खिन्न बोलें ८
ल क्ष्म ण म्हणे शिव करी सृ ष्टि तें उद्धव ९

## अभंग १०३

पंचमुखीं ज्याचें असे बीजमंत्र आणि तो स्व तं त्र ब्रह्मरूप १
तयापासूनीया पं चा चा र्य गण जहाले उत्पन्न ए का ए की २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कोट्यावधी झाला गणांचा परिवार परि ते अमर देवा तुल्य ३
ब्रह्मा म्हणे शिवा विनंती ऐकावी करून दाखवी मृत्यु प्रजा ४
शिवे तत्क्षणीं ह्मी याचे बोला उत्पन्न जो केला सृष्टिक्रम ५
लक्ष्मण म्हणे अमर ही सृष्टि देखतांच दृष्टी वंदा आधीं ६

अभंग १०४

शिवाचे आज्ञेनें गुणे सृष्टि केली सादर आणिला मृत्युलोका १
पंचगणतींचें करिती पालन सावध राहून अहोरात्र २
महेश्वर कृपें माहेश्वर प्राण जाणूनि चिद्घन सुखा राहे ३
वीरशैव प्रजा भूरुद्र असती सामान्य नोहेती गणसृष्टि ४
लक्ष्मण म्हणे पाहावें पुराणीं वर्णी व्यास वाणी रुद्र सृष्टि ५

अभंग १०५

अनंतकोटी ब्रह्मांडें तुझ्या रोमीं सदा दंडे १
विराट तूं सर्वेश्वर मूळ सर्वां तें आधार २
आदी मायेचा तूं भर्ता सर्वांपरी तुझी सत्ता ३
तुझे न कळे लाघव सत्य रूपाचें वैभव ४
वेदें करितां वर्णन झाले पायीं हो तल्लीन ५
श्रेष्ठ श्रेष्ठ ऐसे झाले लवण जीवनीं मिळालें ६
लक्ष्मणा हेंची देई दीन आपुला म्हणवी ७

अभंग १०६

रूप देखीलें नयनीं झाली मी तूं पणा हानी १
सहा पांच चार तीन सुखें झालें हो शरण २
सर्व परिवारा एकी झाली वदवेना मुखीं ३
गुरू मायेनें दावीलें क्षणामाजी कार्य झालें ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्याचा उपकार थोर निरसे तम अंधःकार ५
लक्ष्मण म्हणे त्यातें शरण जावें एक चित्तें ६

## अभंग १०७

काम जो दहन शिव पंचानन ब्रह्म सनातन स्वामी माझा १
पाहिला अंतरीं मुख्य मनपुरीं अर्धांगीं ती गौरी शोभे माता २
शक्ति अस्तुनिया म्हणे ब्रम्ह एक वेद श्रेष्ठ देख साक्ष देती ३
देव तयाप्रति उर्ध्व रेता म्हणाति त्याची माया गती असे थोर ४
जुनाट युगींचा अनंत काळाचा सकळ देवाचा जनक तो ५
लक्ष्मण म्हणे त्वरें आठवा रे मग दुःख बा रे स्वमीं नाहीं ६

## अभंग १०८

मृगजळ हा संसार नका गुंतूं लोभा फार १
दिसतसे सुखमय अंती कदा कामा नये २
जों जों लागूं याचे मागें तों तों अतोनात व्यंगें ३
स्त्रिया पुत्र आणि धन कामें लोभें मोहे मन ४
इतुक्याची करी वोज सरे आयुष्याचें काज ५
लक्ष्मण चिंता दावी बुडे लोभें भवार्णवी ६

## अभंग १०९

मागूं तुज एक देवा घडो भक्तीभावें सेवा १
माता पिता गुरु म्हणे गर्भवासाचीं लक्षणें २
ऐसा देह अमोलिक नेमें करावें सार्थक ३
शिव शिव ही वैखरी वदों नाचूं नर नारी ४
पूजा पत्र गुरु लिंग घडो त्रिकाल अभंग ५
लक्ष्मण वीरशैव जाणा योग्याचें वैभव ६

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अभंग ११०

गुरु प्रसादाची थोरी महिमा असे श्रेष्ठ भारी १
प्रसाद घेतांची स्वामीचा नाश होय षड्रिपूंचा २
मी तूं पणा हा नुरे रे सुख अक्षयीं घेई रे ३
सुख ब्रह्मानंद होय गगनीं आनंद न माय ४
लक्ष्मण म्हणे घ्याहो जन्म मृत्यु चुकवा हो ५

॥ लक्ष्मणाचे अभंग समाप्त ॥

# ॥ श्री शिवदासाचे अभंग प्रारंभ ॥

धन्य आजी दीन भला आम्हां थोर लाभ झाला १
बहुता सुकृताची गांठी तेणें झाली संत भेटी २
मिळे पूर्वजांचा ठेवा किंवा बाळकासी मेवा ३
शिवदास म्हणे देखियलीं शिवयोग्याचीं पाऊलें ४

अभंग २

होतां ज्याचें समदर्शन सर्व पापें होतीं दहन १
भाळ ठेवितां पायास कुबुद्धीचा होय नाश २
होतां जयासी भाषण उरो नेंदी द्वैत भान ३
शिवदास म्हणे आहे धन्य विरक्ताचें पायें ४

अभंग ३

पुरे पुरे हा संसार मन कंटाळलें फार १
जगा करितां अर्जव थोर दुखावला जीव २
आतां धांऊनीयां मिठी प्रेमें घालूं तुझे कंठीं ३
शिवदास म्हणे देवा सदा प्रेमामज द्यावा ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अभंग ४

मना करी लागवेग स्मरी सखा उमारंग १
कोणे वेळें होय काय नाहीं देहाचा निश्चय २
पाहे बा रे हा संसार नची सरे जन्मभर ३
सर्व सांडोनी एका स्मरी कैलासनायका ४
शिवदास म्हणे भावें आधीं स्वहित साधावें ५

अभंग ५

दृष्टी करूनी उफराटी रिघा शूरत्वें त्रिकुटीं १
चहुं शून्या मध्यभाग पहा सखा महालिंग २
होत दशनाद ध्वनीं लागे अवस्था उन्मनीं ३
शिवदास म्हणे तेथें सदा राहे आनंदानें ४

अभंग ६

बा या निजसुखा पुढें काय विषय बापुडें १
मिष्ठान्न नानापरी काय अमृताची सरी २
पहा गंगेचें निर्मळ समय एका मृगजळ ३
शिवदास म्हणे बा रे निजाविण दुःख सारें ४

अभंग ७

निजानंदीं ठाव झाला कोण अपेक्षी देहाला १
देहीं असोनिया मेलों शिवरूपीं सुख घालों २
ऐसें अखंडीत सुख कोण त्यागी महामूर्ख ३
शिवदास म्हणे सदां टाळी लावी ब्रह्मानंदा ४

अभंग ८

धांव धांव चंद्रमौळी रक्षी तुझी ब्रीदावळी १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पतित पावन दिनानाथें करुणाकर नाम तुतें २
असो नामीं अभिमान तारी देवा तरी दीन ३
शिवदास म्हणे आतां सर्व तुझी तुज चिंता ४

अभंग ९

तुझ्या कृपें देवा निश्चित मी आहे सर्व चिंता पा हे माझी तुज १
मजलागीं चिंता हेची देवराया पाहीन मी पाया कधीं तुझ्या २
तुजवीण सर्व दिसे ना श वं त दिसे तें नासत वे ळो वे ळां ३
शिवदास म्हणे अविनाश एक कै ला स ना य क स्वामी माझा ४

अभंग १०

क्षणेक जाणोनी देवा तुजवीण नावरेची जाण कांहीं मज १
गोड तुझी कांती स्वरूप लावण्य सर्वदां ता रु ण्य युगायुगीं २
तैसें तुझें नाम गोड गोड तातां नयेची सरी त्या अ मृ ता सी ३
शिवदास म्हणे ऐसें रूप नाम सर्वदां स प्रे म आ ठ वा वें ४

अभंग ११

शि वा बा ई शिवाबाई मज अ ना था ची आई १
गौरतनु कं ठ शा म अविनाश सु ख धा म २
तुज पाहतां हे माऊले सुख अ खं डि त झालें ३
शिवदास म्हणे आतां मन धालें तुज पाहतां ४

अभंग १२

अग्नी भेटतां कर्पूरा कैंचा आकारासी थारा १
जळलवणा पडे गांठी पुन्हां कैंची उरे खोटी २
जीव शिव झाल्या एक कैंची राहे क र्म रे ख ४
शिवदास म्हणे भला चहू देहां ना ग व ला ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अभंग १३

पाहूनियां नीळकंठा डोळां धरियेला ताठा १
प्रेमें सुखाचें उमाळें जैसा सिंधु उचंबळें २
जैसे कापूराचे रवे तैसे समरस भावें ३
पाहुनियां पंचमुख शिवदास म्हणे सुख ४

अभंग १४

तूंची सखा माझा जीवींचा जिव्हाळा होशी जाश्वनीळा मायबापा १
अनाथाचा नाथ दीनाचा दयाळू गौरतनू भाळीं चंद्र ज्याचें २
कृपेचा सागर करुणेचा घन भाविकाचा पूर्ण इच्छादानी ३
शिवदास म्हणे थोर दयाघन आवडती भक्त प्राणाहून ४

अभंग १५

जोंवरीं काळ पाठीं दडे तोंवरी नाना विघ्न पडे १
कांहीं न चाले सायास जेथें जाय तेथें नाश २
शहाणा होय महा मूर्ख मुख त्यागे होय दुःख ३
शिवदास म्हणे त्रास होय काळ पाठी ज्यास ४

अभंग १६

म्हणती आजी पुढें आला जाणें आनंद आम्हाला १
काळ झालीयां सन्मुख कैंचे भव भय दुःख २
सर्व सुखाचा सोहाळा तो हा आजी साह्य झाला ३
शिवदास म्हणे जाण धन्य धन्य आज दीन ४

अभंग १७

शिरीं जटा आणि भागीरथी असे मौळीं चंद्र दिसे सुशोभित १
भाळीं अग्नी नेत्र कंठ असे निळा अर्धांगीं ती बाळा पर्वताची २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

श्रवणीं शोभती सर्पाचें कुंडल गळां रुंडमाळ विराजीत ३
नाग पाश घंटा डमरू त्रिशूळ आधीं ही सकळ आयुधें करीं ४
गजचर्मांबर ऐसा विश्वंभर तोची दिगंबर समर्थ जो ५
शरीर तें असे शुद्ध श्वेतवर्ण त्यावरी भूषण विभूतीचें ६
शिवदास म्हणे ऐसा जो समर्थ तोची विश्वनाथ स्वामी माझा ७

## अभंग १८

कैसें परी तुझें घडो हें दर्शन न कळे साधन मजलागीं १
न मिळतीं शास्त्रें येकामाजीं एक भिन्न भिन्न देख मार्ग त्यांचे २
आपुलीं मतें बोलती सकळ परी तळमळ न जाय त्यांची ३
तैशापरी मज न सुचे उपाय म्हणोनिया पाय धरिले तुझे ४
शिवदास म्हणे धांव पाव वेगीं तुजवीण जगीं कोण आम्हां ५

## अभंग १९

हीनाचा तांब्याचा जरी तो रुपाया न म्हणेची राया खोटा त्यासी १
आपुली निशाणी असें जया वरीं त्यासी अंगीकारी प्रीतियुक्त २
तैशापरी आम्ही जरी दोषवंत परी तुझा भक्त म्हणवितो ३
म्हणोनी तू माझा न करी अव्हेर करावा उद्धार पतिताचा ४
शिवदास म्हणे तूं तो उद्धारिसी परिबा आम्हासी धीर नाहीं ५

## अभंग २०

बाळकासी माता न करी सांभाळ कैसें परी बाळ वाचेल तें १
चंद्र चकोराचा न पुरविता हेत कैसी त्याची गत चंद्रचूडा २
चातकाची तृषा न हरितां मेघ कैसा मग प्राण राहे त्याचा ३
तैशापरी मज जहालेसे देवा जीवीचीया जीवा भेट वेगीं ४
भेटोनिया पुन्हां नोहेची वियोग ऐसी भव भंग भेट तुझी ५

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शिवदास हेंची मागे वारंवार दयासागर तूं पुरविसी ६

अभंग २१

बहु माझ्या जीवा वाटतसे दुःख कधीं तुझें मुख दाखविसी १
बाळा लागीं माता गेलीया टाकून कैसा त्याचा प्राण वाचे देवा २
युगायुगीं तुम्हीं उद्धरिले जडा ऐसें हीं पवाडे ऐकतो की ३
आम्हाविसीं काय देवा झालें तुज हेंची मज चोज वाटतसें ४
शिवदास म्हणे येवा विश्वेश्वरा भेट दे शंकरा शीघ्र मज ५

अभंग २२

काय माझें मन तुज आंवरेना माझी कां करुणा नये तुज १
किंवा माझें पाप झालें बळीवंत काय माझें चित्त पाहतोसी २
आतां नका पाहूं माझा तो निश्चय दाखवी गा पाय लवकरी ३
शिवदास बोले लडीवाळपणें क्षमा ही करून भेट देई ४

अभंग २३

आतां मी कोणाची न धरीच आंस आमुचा विश्वास तुझे पायीं १
मारी तारी चित्तीं आहे ते करावें आम्हीं जीवें भावें शरण आलों २
शरण आलों तुझ्या नामाची आवडी जीव चरफडी तया सुखे ३
एक वेळां भेटी द्यावी शिवदासा मग सुखीं बैसा अंतरीच ४

अभंग २४

पळपळ व्यर्थ आयुष्य चालीलें वाटें गमाविलें नर देह्या १
आतां केव्हां कृपा करिसी दयाळा लाविसी जिव्हाळा भक्तीचा तो २
भक्तिवीण जीणे जळो का सायास व्यर्थ या भूमीस भार वाहो ३
म्हणोनी शरण शिवदास आला भक्ति प्रेम त्याला देई तुझें ४

अभंग २५

अगा शंभुराया धांव पाव वेगीं तुजवीण जगीं कोण आम्हां १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

म्हणोनिया देई दृढ आलिंगन करावें पावन पतितासी २
पतित मी पापी मूढ मतिमंद परी मनीं छंद आहे तुझा ३
या लागीं मी तूज येतो काकुलती वेगीं गौरीपती भेट देई ४
भेटीवीण दुजे नसेंची मागणें शिवदास म्हणे हेंची देई ५

अभंग २६

काय करूं देवा न सुचे उपाये जेणें तुझे पाय जोडे ऐसें १
नेणो भक्ति तत्त्व नेणो आत्मज्ञान पश्चाताप पूर्ण नाहीं चित्तीं २
साधु संत तुझे अवतार जाण तयासी शरण नाहीं गेलों ३
शिवदास तुज येतो काकुलती काय माझी गती शंभू राया ४

अभंग २७

धांव पाव वेगीं आतां लवकरी मज या संसारीं दुःख वाटे १
दुःखरूप बुडे ह्या भवसागरीं धरूनिया करी ओढी वेगीं २
लोभें मोहें लज्जें घातलीसे मिठी सोडवी धुर्जटी मजलागीं ३
न करी आळस न लावी उशीर नसे मज धीर विश्वेश्वरा ४
कृपासिंधु हो तो तोडी भवपाश ऐसें शिवदास विनवितसे ५

अभंग २८

आतां लवकरी देई मज भेटी होतो बहु कष्टी जीव माझा १
नाहीं तरी तोडी हें भवबंधन सुखरूप पूर्ण करि मज २
ऐसा मनोरथ माझीया जीवींचा भाव अंतरींचा जाणसी तूं ३
शिवदास बहु होतो कासाविसी केव्हां पुरविसी इच्छा माझी ४

अभंग २९

डोळें भरीं तुझें रूप मी पाहीन तैसेचि राहीन सर्वकाळ १
मुखभरीं गुज तुज मी बोलेन सन्निध राहीन दासपणे २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ऐशापरी माझ्या हृदयींचा हेत पुरवी मनोरथ देवराया ३
शिवदास तुम्हां येतो काकुलती उदास विनंती करूनिया ४

अभंग ३०

आम्ही वीरशैव नेणो दुजा देव परी तूंची सर्व जाहालासी १
सर्व नामरूप मज भेट देसी प्रगट झालासी हृदयीं माझ्या २
काय उतराई होऊं मी तुजला ऐसा मज दिला अनुभव ३
हाची अनुभव दृढ राहो चित्तीं करितो विनंती शिवदास ४

अभंग ३१

जैसी कळे तैसी करितो मी स्तुति गोड उमापती करा तुम्ही १
नोहे मी पंडित नोहे बुद्धीवंत नोहे ज्ञानी भक्त आत्म योगी २
नेणते लेकरूं भलतेची बोलें परी सुखी डोले माता त्याची ३
तैशापरी हाही अज्ञानी सेवक न नेणो आणिक तुजवीण ४
काय परिहार देऊं मी तुजला बुद्धि साक्षी तुला सर्व ठावें ५
शिवदास म्हणे मायबाप बंधु तूंची कृपासिंधु सर्व आम्हा ६

अभंग ३२

तुजवीण नेणो आणीक दैवत विश्वेश्वरा सत्य जाण बापा १
तुजवीण कोणा न जाय शरण गेलीया हा प्राण सत्य जाण २
तुजवीण नेणो आणिकाची स्तुती अगा गौरीपती सत्य बापा ३
तुजवीण दुजें नेणेंच मी कांहीं शिवदास पायीं लागतसे ४

अभंग ३३

काहो मजलागीं उपेक्षिले तुम्ही विश्वेश्वरा स्वामी दयानिधे १
तुम्ही उपेक्षील्या कोण सोडविता धांव उमाकांता पाव वेगीं २
पावसी म्हणोनी फार केली आंस शेवटीं निराश करूं नका ३

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शिवदास बहु करुणा भाकित करी वेगीं मुक्त भवपाशीं ४

## अभंग ३४

बहुत दिवस लागली ही आशा भेट जगदीशा लवकरी १
बाळकासी माता उपेक्षिल्या जरी कोण पूर्ण करी मनोरथ २
तैशापरीं तुम्हीं उपेक्षिल्या देवा कोण मनोभावा पुरवील ३
शिवदास म्हणे अगा गौरीवरा वेगीं पूर्ण करा मनोरथ ४

## अभंग ३५

वेगीं झडकरी विश्वनाथा येई भेट मज देई अनाथासी १
बहुत हींपुटीं जहालों मी दीन न सुचे साधन मज कांहीं २
स्वहितासी नेणे जरी तो बाळक तरी माता देख हित करी ३
तैसे परीं माझें तूंची सर्व गोत करी मजमुक्त चंद्रचूडा ४
शिवदास बहु भाकीतो करुणा भेट पंचानना लवकरी ५

## अभंग ३६

सर्व माझी लाज तुज विश्वेश्वरा पतित मी खरा आहे पापी १
आणि तुझा दास म्हणवी मुखानें इतर साधनें नेणें कांहीं २
याचा अभिमान सर्वस्व तुम्हाला सांभाळी ब्रीदाला आपुलीया ३
शिवदास म्हणे उपेक्षाल जरी तरी गती बरी न दिसेची ४

## अभंग ३७

शरण मी आलों तुज विश्वेश्वरा सोडवी दातारा मजलागीं १
वासना ही रांड लागलीसे पाठी होतो बहु कष्टी जीव माझा २
म्हणोनीच तुम्हा येतो काकुलती निजदासाप्रती सोडवी बा ३
तुझा दास ऐसें म्हणवितो जगीं कृपा करी वेगी मजवरी ४
वारंवार हेंची मागे शिवदास वेगी भवपाश मुक्त करी ५

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## अभंग ३८

कैसा माझा तुज पडला विसर होशी विश्वंभर व्यापक तूं १
बहुताचे केले मनोरथ पूर्ण मजविषयीं जाण ऐसें काहो २
भक्त काम कल्पद्रूम म्हणविसी मज कां जहालासी विपरीत ३
लडीवाळपणें बोलिलो हें ऐसें अधिकार नसे मज कांहीं ४
शिवदास म्हणे क्षमाहि करून वेगे भेट देणें मजलागी ५

## अभंग ३९

काय म्यां करावें स्वहित कळेना वृत्तीही वळेना परमार्थी १
कर्मविसें झालों कर्माचें स्वाधीन चित्त लगटेना नामरूपीं २
माझा मीच कोण नकळे मजसी तुझ्या स्वरूपाशीं जाणूं कैसे ३
ऐसेंपरी मज जहाले दुस्तर अभय तूं कर ठेवी माथां ४
शिवदास म्हणे तुझ्या भेटीविण सर्व मज शीण वाटतसे ५

## अभंग ४०

बहुरूपीं सोंग दावीता जनासी इच्छीलें दे त्यासी संतोषेनीं १
तूं तो त्रिलोकयाचा आहेसिगा भूप आम्ही बहुरूपें दाखविली २
पाहोनी तें रूप जरी तूं प्रसन्न वरी देई दान सायुज्य गा ३
नाहीं तरी सोंग नको आणूं पुन्हा ऐसें तरी म्हणा मज प्रती ४
शिवदास म्हणे न लावी उशीर कंटाळलों फार सोंगासी या ५

## अभंग ४१

ज्याचें चितीं तुझा वास त्याचा होईन मी दास १
जैसा माझा मनोरथ तै तूं पुरवीगा अर्थ २
त्याचें मुखें तुझे गुण सदां सर्वदा ऐकेन ३
शिवदास म्हणे शिवा त्याचें दास्य देई देवा ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## अभंग ४२

चित्तीं विषयाचा ध्यास मुखें म्हणवितो दास १
ऐसा दुष्ट मी पतित नसे विषयीं विरक्त २
ऐसा असोनी दुर्गुण तुज आलों मी शरण ३
तरी ते न पाहतां कांहीं शिवदासा भेट देई ४

## अभंग ४३

कैसें करूं मी भजन होईनाकी स्थीर मन १
तूंची करता करविता देवा अवघी तुझी सत्ता २
आम्ही बाहुल्याच्या जातीं सुत्र दोरी तुझे हातीं ३
जैसें नाच विसी देवा तैसें नाचूं सदा शिवा ४
शिवदास म्हणे आतां आम्हां लावी भक्तीपंथा ५

## अभंग ४४

आम्ही नेणो भक्ती भाव चित्तीं भेटा याची हाव १
भेट भेट बा शंकरा सखया पार्वतीच्या वरा २
नंदी भृंगी सहीत यावें मज अनाथा तारावें ३
शिवदासासी तारक ऐसा निश्चयेची एक ४

## अभंग ४५

माझ्या विश्वेश्वरा येई मज दीना भेट देई १
माझ्या महादेवा यावें मज पतिता तारावें २
येई माझ्या तूं शंकरा देई भेट विश्वेश्वरा ३
भेट भेट शंभुराया शिवदास लागे पाया ४

## अभंग ४६

काय तुज आम्ही मागतसे देवा त्या लागीं तूं धांवा न ऐकसी १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

न ऐकसी जरी आमुची विनंती तरी त्रिजगतीं ठाव नाहीं २
ठाव नाहीं मज तुजवीण हरा म्हणोनिया त्वरा धांव वेगी ३
धांव पाव सांबा शिवदासा लागीं तुजवीण जगीं कोण आम्हा ४

अभंग ४७

पश्चात्ताप देई देवा जेणें घडे तुझी सेवा १
नाहींतरी दे मरण व्यर्थ जीणें भक्तीवीण २
म्हणोनिया वेगी हरा दोहींतूनीं एक करा ३
शिवदासा वाटे खंती म्हणोनी येतो काकुलती ४

अभंग ४८

निजूं नका जागा जागा पुढें आहे बहु दगा १
लक्ष चौऱ्यांशीचा फेरा जेणें चुके ऐसें करा २
सर्व काळ करा भक्ती दुजें येऊं नदी चित्तीं ३
शिवदास म्हणे मना तूंही ऐकवा सज्जना ४

अभंग ४९

तुझी धरियेली कास तारी आम्हा पतितास १
बहु तारीले पतित ऐशी ऐकिली म्यां मात २
म्हणोनिया तुझी आंस फार लागली जीवास ३
शिवदासा प्रती तारी धांव पाव मदनारी ४

अभंग ५०

सर्व देवा माजीं थोर एक माझा उमावर १
विष्णु पूजी त्याचे पाय इतरांचा पाड काय २
मिथ्या नोहे हें भाषण पहा पुराण शोधून ३
शिवदास म्हणे शिव सर्व देवाचा तो देव ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## अभंग ५१

आम्हां ऐसे पुण्यवंत कोणी नसे त्रैलोक्यांत १
बहु आमुचें सुकृत म्हणोनी झालों शिवभक्त २
आतां चुकली चौऱ्यांशी वास करूं त्या कैलासीं ३
शिवदास म्हणे शिव दासा कैचा पुनर्भव ४

## अभंग ५२

मागें बहुतांचे अर्थ पुरविले मजविषयीं झालें काय नेणो १
तरी आतां ऐसें न करीं दयाळा नसे धीर या वेळा विश्वनाथा २
बाळालागीं माता येतसे धांवून परी तो रुदन करीतसे ३
तैसे परि माझे मनीचा भावार्थ पुरवी वांछितार्थ शीघ्र देवा ४
शिवदास म्हणे पुरवाल हेत तों वरी दुश्चित धीर नसे ५

## अभंग ५३

काय वांचोनिया व्यर्थ भूमि भार तुझ्या पायीं स्थिर मन नसे १
न घडेची पूजा न घडें भजन नसे भक्ति ज्ञान वैराग्य तें २
सर्व गुणी ऐसा अपराधी खळ परी तूं दयाळ भक्तालागीं ३
न पाहे कांहीं कोणता सद्गुण व्याधा उद्धरून नेले देवा ४
चांडाळीनें बेल सहज टाकीला कृपासिंधु जहाला समाधान ५
ऐसा हा निश्चय धरोनीया पोटीं शिवदास भेटी इच्छितसे ६

## अभंग ५४

पतित मी पापी असे मतिमंद परी मनी छंद वसे तुझा १
तुजवीण कोणा येऊं काकुलती कोण माझी खंती उडवील २
मोह लज्जा भय न सोडीच मज सोडवितां तुजवीण कोण ३
तुजवीण माझे दुजे कोणी नाहीं शिवदास पायीं लागतसे ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

### अभंग ५५

माझेचीं प्रारब्ध झालें अनिवार हेची मज फार चोज वाटें १
अल्प आयुष्याचें दीर्घ वय केलें मजलागीं झाले काय तुम्हां २
मृत्यु झाले त्यासी पुन्हा उठविले मजविषयीं झाले काय तुम्हां ३
ऐसें असंख्यांत भक्त त्वां रक्षिलें मजविषयीं झाले काय तुम्हां ४
शिवदास म्हणे वाटतसे खंती वेगीं गौरीपती भेट देई ५

### अभंग ५६

धरी हातीं किंवा टाकी या भवांत जे तुज उचीत ते तूं करी १
परी तुझी सेवा देई मज प्रेमा मग सुखें आम्हां जन्मा घाली २
जन्मा घाली नाहीं भीत या भवासी कृपावंता होसी साह्य जेव्हां ३
साह्य होऊनिया हृदयीं वसावें शिवदासा द्यावें दान हेंची ४

### अभंग ५७

कामें क्रोधें लोभें मूढ झाली मती चालली दुर्गती तेणें योगें १
तुझे दास आम्ही दुर्गतीस जातां त्याची गौरीकांता लाज कोणा २
अघटीत हें तो न घडे कल्पांती परी आम्हां प्रती घडलेसे ३
शिवदास म्हणे निजदासा मुक्त करणें हेंची उक्त आहे तुम्हा ४

### अभंग ५८

चौऱ्यांशी लक्ष घेऊनी या सोंग तुज यथा सांग दाखविलें १
परी त्वां आम्हांसी दिलें नाहीं कांहीं आतां तरी देई मोक्षदान २
नाहीं तरी स्पष्ट सांग बा आम्हासी न आणी सोंगासी म्हणोनिया ३
शिवदास म्हणे एक दोहोतूनी करी शूळपाणी लवकरी ४

### अभंग ५९

तुझें करा या पूजन सहस्त्र हस्त शक्ति हीन १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तुझें स्वरूप पहायासी शक्ति नोहे सहस्राक्षासी २
तुझी वर्णावया कीर्ति सहस्र मुखां नोहे शक्ति ३
तेथें माझा केवा किती पुजूं पाहूं वर्णूं स्तुति ४
शिवदास म्हणे बाप तुझें नामीं करूं जप ५

## अभंग ६०

तुझें नामीं प्रीती जडो दुजें विषय नावडो १
ऐसे करी माझें चित्त कृपा करोनि सतत २
मग पूर्व कर्म जैसे मज भोग घडो तैसे ३
त्याचा कांहीं तुम्हावर देवा न घाली मी भार ४
म्हणे शिवदास कामारी नामीं प्रीति दे सत्वरी ५

## अभंग ६१

कांहीं न मागे मी तूज एक्या नामावीण दुजें १
नामें हरे भव दुःख नामें लाधे आत्म सुख २
ऐसें सोडोनिया नाम कोण इच्छी अन्य काम ३
शिवदास म्हणे स्वामी देई प्रेम तुझें नामीं ४

## अभंग ६२

आम्हीं शरण शरण आलों काम क्रोधा भेणें १
बळें सकळ झोंबती नाहीं नाहीं बा विश्रांती २
करूं न देती भजन यास्तव आलों मी शरण ३
पंचाक्षरी तूंची एक निवारितां द्वंद्व दुःख ४
शिवदासासी तारक आदी अंतीं तूंची एक ५

## अभंग ६३

आम्हीं अपराधी खळ अंगीं नाहीं भक्ति बळ १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

क्षमा दया नाही शांती भक्ति भाव नाहीं चित्तीं २
नाहीं ज्ञान ध्यान योग नेणो कोणताही मार्ग ३
परी निश्चय चित्तासी शिवदास उद्धरिसी ४

अभंग ६४

शरण आलों मी दयाळा देई भक्ति गा प्रेमळा १
मुखीं म्हणे मी शरण शरण यावें कैसे नेणे २
देहीं बुद्धि दृढ झाली हिताहित विसरली ३
पश्चाताप नसे चित्तीं विषयीं वाढलीसे प्रीति ४
नाहीं प्रेम अंगीं भक्ति ऐसा खळ मूढमत्ती ५
परी लागलीसे आंस भेटा म्हणे शिवदास ६

अभंग ६५

तुझे न करितां दास्य व्यर्थ चालीलें आयुष्य १
यासी आतां करूं काय मज सुचेना उपाय २
म्हणोनी आलें शरण करी पतिता पावन ३
शिवदास म्हणे तुझें पतित पावन ब्रीद गाजे ४

अभंग ६६

कांहीं न रुचे बा मज तुझें नामाविण आज १
जरी नाना विषय सुख तरी ते भासे मज दुःख २
अथवा स्वर्ग भोग देसी तरी तो कारण भवासी ३
शिवदास म्हणे शिवा नामीं प्रेमा देई देवा ४

अभंग ६७

टाकून प्रपंच व्यवहार यारे सज्जन हो सत्वर १
साह्य होऊं एक मेकां भजूं कैलास नायका २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ब्रह्मानंदें नाचूं सर्व वाचें वदू शिव शिव ३
करूं जन्माचें सार्थक मिळोनिया सकळीक ४
शिवदास म्हणे ऐका लाज आळस धरूं नका ५

अभंग ६८

जो का म्हणवी आपुला सांब तारीतसे त्याला १
न पाहेची पुण्य पाप अवघे करीतसे माफ २
नामीं देऊनीया प्रेम हरीतसे मृत्यू जन्म ३
शिवदास म्हणे त्यासी तुम्ही भजा सद्भावेसी ४

अभंग ६९

पतित पावन तुझें ब्रीद म्हणोनी वाटे मज खेद १
कीं मी पतित तो खरा पावन करिसी शंकरा २
म्हणसी तारिलें बहुत तरी ती जीर्ण झाली मात ३
शिवदास म्हणे तारी ब्रीद सोडी नाहीं तरी ४

अभंग ७०

हेंची मागो तुज प्रती पाडी देह्याची विस्मृती १
देवा तरीच ध्याऊं ध्यान आम्ही सुखी होऊं पूर्ण २
ऐसे समजलों गुज म्हणोनी विनवितो तूज ३
शिवदास म्हणे तरी ब्रीदा रक्षी नानापरी ४

अभंग ७१

कैसें असें तुझें रूप आम्हीं नेणो तें स्वरूप १
सगुण निर्गुण त्रिगुण एक निश्चय नोहे पूर्ण २
कैसा अससी शंकरा विश्वनाथ विश्वेश्वरा ३
नमस्कार त्या रूपास असो म्हणे शिवदास ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अभंग ७२

किती पहासी निर्वाण जाऊं पाहे माझा प्राण १
म्हणोनीया धांव घेई भेट मजला लवलाही २
तुजवीण माझे कोण नसे त्रिलोकींही जाण ३
म्हणोनी या शिवदासा भेट भेट गा विश्वेशा ४

अभंग ७३

मृत्यु असोनिया शिरीं सुख मानीतां संसारीं १
काय म्हणावें तुम्हाला ऐसे कैसे मूढ झाला २
आतां तरी व्हा सावध कोण मी हा करा शोध ३
तेणें नोहे जन्म मृत्यू शिवदास म्हणे सत्य ४

अभंग ७४

विष्णु थोर शिव थोर ऐसे भांडो भांडणार १
आम्हीं न लागूं त्या छंदा व्यर्थ कोण करी निंदा २
भजूं एका विश्वेश्वरा न भजूं न निंदू श्रीधरा ३
शिवदास म्हणे साचें मुख्य वर्म हो भक्तीचें ४

अभंग ७५

मुखीं नाम मनीं ध्यान ऐसें देई मज दान १
तुम्हा देणें हें उचित आम्हां मागणें हें हित २
यासी न करी आळस होतो आयुष्याचा नाश ३
शिवदास म्हणे त्वरा इच्छा पुरवावी शंकरा ४

अभंग ७६

रामचंद्राचा ई श्व र तो हा जाणा रामेश्वर १
हें तो असोनी प्रसिद्ध नेणती गा मतिमंद २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

म्हणती शिव स्मरें राम न कळे तया मुख्य वर्म ३
कोण सेव्य आणि सेवक याचा करा हो विवेक ४
शिवदास म्हणे शिव सर्व देवांचा तो देव ५

## अभंग ७७

अनन्य शरण आदी गणानाथा पार्वतीच्या सुता लंबोदरा १
कळा विद्या सर्व सिद्धींचा नायक कल्याणदायक वृंद मूर्ती २
मूषक वाहन पाशांकुश धरा हेंची दे दातारा कृपादान ३
बैसोनी हृदयीं वदवावें स्तोत्र जेणें भाळ नेत्र वश होय ४
शिवदास म्हणे करी प्रेमवृष्टी जेणें पडो मिठी शिवा पायीं ५

## अभंग ७८

आतां नमस्कार माझा वेदमाता ब्रम्हात्मजा १
श्वेतांबर हंस वाहनीं करी वीणा मंजूळवाणी २
स्मरू वाटतो शंकर नाहीं अंगीं तालसूर ३
त्वरें माऊली त्वा यावें माझ्या रसनीं बैसावें ४
शिवदास म्हणे आतां तोषवावें गौरीनाथा ५

## अभंग ७९

लागा वेगीं आतां प्रेमानंद मिठी घालूं पदां गुष्ठीं सद्गुरूच्या १
जेणें शब्दांजन लेवोनिया कानी स्वरूप करोनी ठेवियले २
काय उपकार होऊं मी उतराई देहादिक आहे नाशवंत ३
मौन्य सद्गद होऊनीया चित्तीं तुज कृपामूर्ति प्रणीपात ४
शिवदास म्हणे अखंड प्रेमेशीं तुझे चरणासी ऐक्य करी ५

## अभंग ८०

ॐ नमोजी सदाशिवा सर्व देवाचीया देवा १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नाम तुझें म हा दे व हाची येतो अनुभव २
प्रेम हंसा निरालंबा कोठें गुंतलासी सांबा ३
निर्गुणा तूं सगुणा येई मज दीना पाय दावी ४
शिवदास म्हणे त्वरा येई सख्या करुणा करा ५

अभंग ८१

दश भुज पंचमुख त्रिनयना वृषभ वाहना म हा रा जा १
जटाजुटीं गंगा मुगुट सुंदर कंठीं शेष हार शोभीवंत २
श्रवणीं कुंडल दिसे मनोहर कपाळीं त्रिपूंड्र भस्म शोभे ३
गौरतनुवरी गजांबर शोभा उमासहित उभा शंभुराया ४
शिवदास म्हणे सर्वकाळ पायीं ठेवोनिया डोई पाहूं रूप ५

अभंग ८२

बहु जन्मीचा सोयरा होशी माझ्या उमावरा १
आतां वि स र सी कां बापा कैलास नायका २
माझें जीवीचें जीवना येई सख्या पंचानना ३
हेंची माझी तळमळ पाहूं तुझें पदांजूळ ४
शिवदास म्हणे मिठी प्रेमें घालूं तुझे कंठीं ५

अभंग ८३

येई माय आतां कैलास निवासी भव भय पिसें वारी माझे १
पाडस मी तुझें तूं होशी हरणी नको भवारण्यीं सोडूं मज २
कामधेनू तूं मी वत्स तुझे पायीं नको चोरू मायी प्रेमपान्हा ३
तान्हुलें मी तुझें तूं होसी जननी घेई उ च लू नी माय माझी ४
शिवदास म्हणे चातक मी जाणा भाकितों करूणा वृष्टि करी ५

अभंग ८४

जय जयाजी जाश्वनीळा वेगीं येई हो दयाळा १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

जय जयाजी निरालंबा कोठें गुंतलासी सांबा २
तुझें लडीवाळ तान्हें पडिलें भवाब्धींत जेणें ३
वेगीं फिरवा दृष्टि देवा लक्ष लावा स्वयें भावा ४
शिवदासाची वि नं ती मान्य करा उमापती ५

अभंग ८५

अहो देवराया कोठें गुंतलासी वेगी या रंकासी पाय दावी १
तुजवीण मज प्रतिपाळ कर्ता कोणी उमानाथा दुजा नाहीं २
तुझा हस्त जरी माझें शिरीं पडता मग उमानाथा काय उणें ३
यास्तव शंकरा धांऊनिया वेगीं मज रंका लागीं पाय दावी ४
शिवदास म्हणे अहो उमाकांता तुझी तुज चिंता नाहीं काय ५

अभंग ८६

आम्हां पतितासी करावें पावन हेंची थोरपण तु म्हा क डे १
पुण्यवंत होती पावन सहज तेथें थोरपण तुज काय २
तरे त्या तारीता नवल तें कोण बुडे त्यासी जाण तारावेंजी ३
म्हणोनी करुणा भाकी शिवदास तारी पतितास आम्हां देवा ४

अभंग ८७

देवामाजी देव परम तूं भोळा न पाहसी शीला कांहीं एक १
कांहीं तरी मीषें करूनीया देवा असंख्यात जीवा उद्धरीसी २
दृष्टि आड बेल टाकी खुडूनीया तारियेलें तया कृ पा नि धी ३
चांडाळी ती बेल टाकी झुगारूनी ते पूजा मानोनी उ द्ध रि ले ४
ऐसे अगणित तारीलें दयाळा माझीया कपाळां ऐसे काहो ५
शिवदास म्हणे वाटतसे खंती वेगीं उ मा प ती भेट देई ६

अभंग ८८

किती तुम्हां लागीं यावें काकुलती दया तुम्हाप्रती न ये माझी १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तुजवीण कोण सोडवी येथून कर्माची गहन गती दिसे २
धांव पाव वेगीं न करी आळस तोडी भवपाश लवकरी ३
जन्मोजन्मीं झालों दास मी शंकरा न मागे मुशारा तुज कांहीं ४

अभंग ८९

वारंवार तुम्हां मागणें तें एक वियोगाचें दुःख न का देऊं १
सदा सर्वकाळ स्वात्म सुख देई प्रगट तुं होई हृदयीं माझ्या २
प्रगट होऊनी दाखवी तें रूप सगुण स्वरूप सुंदर जें ३
शिवदास म्हणे सगुण निर्गुण तूंची दुजें कोण आहे तेथें ४

अभंग ९०

तुझा बा विसर नसो पळभरी ऐसे मज करी शंभुराया १
देवोनिया मज दृढ आलिंगन करी समाधान अनाथासी २
तुजवीण प्राण होतो कासाविसी केव्हां भेट देसी विश्वेश्वरा ३
भेटोनिया पुन्हां नोहेची वियोग ऐसी तूं अभंग भेट देई ४
शिवदास मागे हेंची वारंवार तूं दयासागर पुरविसी ५

अभंग ९१

किती तुम्हां लागीं यावें काकुळती मज बहु खंती वाटतसे १
माझेंची प्रारब्ध झालें अनिवार हेंची मज चोज वाटतसे २
चौदा कल्पवरी मार्कंडी रक्षिले मजविषयीं झालें काय तुम्हां ३
ऐसें बहुताचें प्रारब्ध हरिले माझेची कां पडे कोडें तुम्हां ४
तरी आतां स्पष्ट द्यावेंजी उत्तरा भोगोनीया साऱ्या प्रारब्धाशी ५
शिवदास म्हणे सोडोनीया आस भोगूं सावकाश प्रारब्धाशी ६

अभंग ९२

षोडश वर्षाचें चवदा कल्प केलें प्रारब्ध राहिले कोठें त्याचें १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

माझ्या प्रारब्धाची राखीसी मर्यादा म्हणोनीया खे दा तु र आम्ही २
तुम्हावीण कोण निवारी हें दुःख धांव पाव मुख दा वी म ज ३
जैसे तैसे परी म्हणवितो दास करी पतितास पा व न तूं ४
शिवदास म्हणे न करी उपेक्षा धांव कर्माध्यक्षा ल व क री ५

अभंग ९३

गाळांमाजी पशु पडले रुतूनी निघणें तेथूनी नोहे जै से १
तैसे माझें मन गुंतलें विषयीं काढी लवलाही तूंची त्यासी २
बहुतांचा तुम्हीं केला जी उद्धार माझा कां विसर कृ पा नि धी ३
शिवदास म्हणे अगा सर्वेश्वरा वेगीं मुक्त करा प ति ता सी ४

अभंग ९४

पाहुनी सुक्तीक म्हणती रजत कांचासी म्ह ण त दिव्यमणी १
पीठमिश्र जळ भावें त्यासी क्षीर मृगजळ नीर म्हणती सत्य २
तैसे शिवावीण इतर दैवत भावित ते नर मूर्ख जाणा ३
शिवदास म्हणे महादेव देव इतर ते स र्व दा स त्याचे ४

अभंग ९५

उदंड तें गाती उदंड वर्णिती उदंड सांगती क्षेत्र महिमा १
कपिलधार ऐसें स्थळ कोठें नसे प्रत्यक्ष तें भासें कैलासची २
पूर्वेकडोनीया शिवगंगा वाहे उत्तरेस आहे भा गी र थी ३
पंचकुंड जे का पवित्र ते तीर्थ समाधी मन्मथ महाराजांची ४
ऋषी सहीत जेका वसोनी पांडव इच्छितार्थ सर्व लाधले हो ५
देह शमवीत कपिलमहामुनी वसे तया स्थानीं सर्व काळ ६
शिवदास म्हणे आम्हां दीनासाठीं स्थळ हें धुर्जटीं निर्मीयलें ७

अभंग ९६

आधी नमु उमापती जो कां असे आदिअंतीं १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मध्यें जें हें विश्व भासे त्यातें व्यापक तो असे २
जैसा पटामाजी तंतु तैसा विश्वीं उमाकांत ३
शिवदास म्हणे त्याला आम्ही नमो वेळोवेळा ४

अभंग ९७

जिव्हीं नाम श्रवणीं कीर्ती नेत्रीं वसो तुझी मूर्ती १
मन तुझे पायीं स्थीर राहो माझें निरंतर २
विसरोनी देहभाव तुज न सोडो हा जीव ३
शिवदास म्हणे हरा हेंची दान दे दातारा ४

अभंग ९८

विश्वी असोनी व्यापक कां गा न ऐकसी हांक १
नोहे उचित हें तुज भेट सत्वर तूं मज २
तुझा म्हणवितो दास नको पाहूं गुण दोष ३
शिवदास म्हणे भेट देता न लावी मी झट ४

अभंग ९९

शिरीं जटा हेम बाळा मौळीं चंद्र नेत्रीं ज्वाळा १
कर्णीं सर्प कंठीं वीष वामभागीं उमा वसे २
जाळूनीया मन्मथासी राख लाविली अंगासी ३
गळा शोभे रुंड माळा कंठ दिसतसे नीळा ४
ऐसें रूप मज कधीं दाखविसी कृपानिधी ५
लागलासे निजध्यास भेटा म्हणे शिवदास ६

अभंग १००

घालूनिया पद्मासन हृदयीं बैसावें येऊन १
येणें जाणें तुम्हां नाहीं परी भेट आम्हा देईं २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बुद्धीहीन मंद आम्ही ज्ञानचक्षु देई स्वामी ३
पाहुनी सुंदर रुपडे बहु हृदयीं आवडे ४
स्वामी पूर्ण करा हेत शिवदास विनवीत ५

अभंग १०१

काय करूं कोठें जाऊं काय अंगा राख लावूं १
काय करूं देह पात काय बसू अरण्यांत २
काय करूं उपवास काय करूं जीव नाश ३
शिवदास म्हणे जिणें व्यर्थ भासे भक्तिवीणें ४

अभंग १०२

आम्ही नकरू ही व्रतें नच जाऊं दुजा तीर्थे १
न करूं योग अभ्यास नेणो तपाचें सायास २
सर्वकाळ स्मरूं शिव जेणें नो हे पुनर्भव ३
ऐसा लाभ टाकूनिया व्यर्थ कोण शिणे वाया ४
म्हणोनीया शिवदास करीतसे नाम घोष ५

अभंग १०३

इतके देईंगा तूं आम्हां मग सुखें घाली जन्मा १
तुझा विसर नसावा संग साधूचा असावा २
नको विषय कांहीं मनीं असो प्रेम तुझें गुणीं ३
जन्मोजन्मीं तुझा दास करी म्हणे शिवदास ४

अभंग १०४

नर देहासी येऊनी व्यर्थ झालों शूळपाणी १
कीं त्वां केली नाहीं कृपा पुढें कैशा चुकती खेपा २
यासी ग्वाही माझें चित्त कीं तें विषयीं अशक्त ३

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शिवदास म्हणे आतां विषयातीत करी चित्ता ४

अभंग १०५

जोंवरी काळ होता पाठीं तोंवरी झालों फार कष्टी १
लक्ष चौऱ्यांशी फिरलों दुःखें अमित भोगलों २
काळ नसोनीया साह्य वासनेचें मूळ राहे ३
तेणें गर्भवासादीक फार सोसीयलें दुःख ४
शिवदास म्हणे पाहे आजी काळ झाला साह्य ५

अभंग १०६

आतां नमस्कार पाया तुझें सखया काळ राया १
ऋद्धीसिद्धीच्या दातारा सर्व सुखाचा सोयरा २
दीनानाथ तुज प्रती हेंची माझी गा विनंती ३
सावधान पायीं मिठी पडो शंभूच्या शेवटी ४
शिवदास म्हणे शिव तुची होसी काळ राव ५

अभंग १०७

तुज रिघालों शरण हेंची देई कृपादान १
नेणो तुज मागूं काये जाणसी तूं बाप माय २
सदा संतोषें त्वां रहावें माझें परम हित व्हावें ३
तुझा म्हणवोनी दास कीर्ति व्हावी त्रैलोक्यांस ४
शिवदास म्हणे पायीं तुझ्या मज प्रेम देई ५

अभंग १०८

नर देहा ऐसा लाभ प्राप्त झाला प्रारब्धे १
तो गमावीला व्यर्थ कांहीं न करितां स्वार्थ २
ऐसा मी तो दैवहात नसे तुझ्या ध्यानीं चित्त ३

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शिवदास म्हणे जीवें मज मारूनी टाकावें ४

अभंग १०९

तुजवीण शंभूराया व्यर्थ जन्म गेला वाया १
शिव भक्ती नाहीं केली व्यर्थ शिणविली माऊली २
झालों संसार कबाडी सुख नाहीं पलघडी ३
आयुष्याचा नाश झाला दास म्हणे वाया गेला ४

अभंग ११०

आजी भूमी सुतदिन राहू पश्चिमेसी जाण १
तया दिशे जाऊं नये काळ राहू पुढें होय २
ऐसें प्रणताची लोक शिवदास मानी सौख्य ३

अभंग १११

द्रव्य नाहीं जयापाशी ऐका त्याची गती कैसी १
जेणें कंटाळती सर्व हा करितो उपद्रव २
माता पिता कन्या सुत दुष्ट उत्तर बोलत ३
भार्या आवडीची मोठी घाली कपाळासी आठी ४
सर्व द्रव्य लोभी देखा नाहीं कोणी प्राणसखा ५
शिवदास म्हणे पाहे सखा एक शंभू आहे ६

अभंग ११२

धन्य धन्य गुरुमाय आजी देखीयेले पाय १
तुज पाहता माऊले पाप ताप दैन्य गेले २
तुझ्या वचनामृतें जहालों मी पूर्ण तृप्त ३
शिवदास म्हणे दाता नाहीं सम गुरुनाथा ४

अभंग ११३

किती उदार सद्गुरु नाहीं ज्यासी अंतपारू १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

घे वो नी या कां च वा टी दि व्य र त्न दे गोमटी २
घेवोनीया खा प री स सखा दे त से परीस ३
ना श वं त उ प चा रा अर्पि स्वानंद सागरा ४
शिवदास म्हणे किती द या वं त गुरुमूर्ती ५

अभंग ११४

येई येई आतां माझीये माऊले दाखवी पाऊलें कृपाळुवे १
वेळोवेळां तुज देखिल्या वांचून न पडेची चैन पळभरी २
घडोघडी तुज पाहोनीया डोळा स्वरूप सोहोळा भोगूं प्रेमें ३
शिवदास म्हणे देवा तुजवीण नावडेची जाण मज कांहीं ४

अभंग ११५

तानुलीया बाळा जवळीच आहे परी माय माय हाका फोडी १
क्षणोक्षणां पाहे माऊलीचें मुख मग खेळे सुखें आवडीनें २
तैसे वेळोवेळां पाउलें पाहीन आवडी गाईन गुण तुझे ३
शिवदास म्हणे क्रीडेन स्वानंदें शिव शिव छंदें घेवोनीया ४

अभंग ११६

अहो या स्वरुपाचा पार पाहूं जाताती पामर १
वेद चा री मौनावले महा ऋषी वृध्द झाले २
ध रा ध र द श श त मुखें पुरला नाहीं अंत ३
ते थें दुर्बळ हे वे डे सीमा लाविती बापुडे ४
शिवदास म्ह णे दे वा अंत नसे ब्रम्हादिका ५

अभंग ११७

धांव न पुरे मनाची गती खुं ट ली वाचेची १
जया विलोकीता दृष्टी झाली तरळोनी उफराटी २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

न से त्रिगुणासी री घ सखा ऐसा उ मा रं ग ३
शिवदास म्हणे किती तयें मा न वा ची गती ४

अभंग ११८

लवण गेलीया सागरा पुन्हां न परते माघारा १
भेटे कर्पूर अग्निसी नये मागूता ठायासी २
सती पति झाल्या भेटी प्रगटवेना गुज गोष्टी ३
शिवदास म्हणे मौन बोलावया नाहीं स्थान ४

अभंग ११९

घ डो घ डी प्रेमभावां मना आठवी महादेवा १
सर्व सांडोनी जंजाळ शि व प दीं ठेवी भाळ २
नाहीं साधन या वीण पाहे अंतरीं शो धू न ३
शिवदास म्हणे हर सर्व सु खा चे आगर ४

अभंग १२०

देवा तूंची अंगीकार केल्या काय माझा भार १
गुणनिधी ऐसा दोषी केले कुबेर त्वां त्यासी २
गुरु द्रोही चंद्र झाला तो त्वां मौळीं धरियेला ३
ऐसें किती महापापी मिळविले नि ज रू पीं ४
शिवदास म्हणे जाणा मुख्य तुज यावी करुणा ५

अभंग १२१

करुणा कर दीनानाथा पतित पावन कृपावंता १
ऐसें बोलती स र्व ही वरी वेद गर्जे पाही २
जाणोनीया शूळपाणी आलों पायीं लोटांगणी ३
शिवदास म्हणे आतां धांव पाव उमाकांता ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## अभंग १२२

भय कासीयाचें नको धरूं अंगीं कांहीं तुज लागीं मागे मी १
नको धन सुख ऐश्वर्य संपदा नामीं राहो सदा छंदा तुझ्या २
भजन पूजनीं प्रेम अखंडीत सज्जना संगत वास देई ३
शिवदास म्हणे सदा शूळपाणी राहे ध्यानीं मनीं वाचें माझ्या ४

## अभंग १२३

लक्ष लावा शिवा पायीं हित यावेगळें नाहीं १
सर्व मायेचा व्यवहार भास जैसे मृगनीर २
तरी सावधान व्हावें जगा सर्व सोहंभावें ३
शिवदास मारी हाका आतां दीन लोटूं नका ४

## अभंग १२४

गेले मोठे मोठे थोर नभीं गंधर्वांचे भार १
अवतारादी चिरंजीव तेही लोपती स्वभावें २
ऐसी माव ईश्वराची बहु गोळ मोडीवरची ३
शिवदास म्हणे ऐका तया नादीं लागूं नका ४

## अभंग १२५

पुरे पुरे हा संसार देवा त्रासलों मी फार १
मन विटलें सर्वांसी तेणें आलों पाया पाशीं २
आतां येई शिवराया भक्त काज कैवारी या ३
गोड रूप ऐसें दावी दृष्टी कदा न फिरावी ४
शिवदास म्हणे ताता नको अंत पाहूं आतां ५

## अभंग १२६

काय बोलूं मी अपार देवा जाणसी अंतर १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नाहीं अंगीं शुद्ध भाव परी भेटायाची हाव २
अंगीं नाहीं प्रेम गोडी परी पायाची आवडी ३
सर्वांपरी व्यंग देखा परी तुमचा लाडका ४
शिवदास म्हणे आई धाव माझे शिवाबाई ५

अभंग १२७

देखोनिया उंच माडी आलों धावूनी तांतडी १
कीर्ति ऐकिली भूमंडळीं म्हणूनी देतसे आरोळी २
द्वारीं दाटले सुरवर मुनी गंधर्वांचे भार ३
वाजताती नाद भेरी दश वाद्याचे कुसरी ४
ध्वनी करिती आरोळी शिवनाम कर टाळी ५
शिवदास म्हणे तेव्हां विसरलों मी देहभावा ६

अभंग १२८

कैंचा दाता आणि मागतां सर्व तूंची उमानाथा १
काय सामर्थ्य दात्याचें अर्थ पूर्वीं याचकाचें २
विश्व कुटूंबी ईश्वर तूंची रक्षिता सा चा र ३
शिवदास म्हणे सर्व वर्णूं किती गुण गौरव ४

अभंग १२९

सर्वां भूतीं दया लक्ष्या माजीं एक आहे मी दांभीक घरोघरीं १
बहुतांत एक प्रेमाचा पुतळा होती बहु गोळा वेषधारी २
शिवदास म्हणे पोटाचें हें सोंग तेथें उमारंग स्थीर कैंचा ३

अभंग १३०

नाहीं तुझी बरी चाल काय देवावरी बोल १
नाहीं अंतरीं निर्मळ काय घालुनीया माळ २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वृत्ती ठेवी सदा कोपी काय घालूनीया टोपी ३
नाहीं अंगीं क्षमा शांती काय लावोनी विभूती ४
शिवदास म्हणे मोक्ष नसे न होता मुमुक्षे ५

अभंग १३१

तुजवीण शंभु लिंगा नाहीं अणु रिती जागा १
सर्व लिंगाकार दिसे मही वीट लिंग असे २
कैसा करूं भेदभाव जेथें तेथें महादेव ३
ऐसी आम्हा आली प्रचीती वरी वेदही गर्जती ४
शिवदास म्हणे शिव परिपूर्ण स्वयमेव ५

अभंग १३२

नको वेळ बारे उठावें तातडी आली ऐसी घडी पुन्हां न ये १
येईल ऐश्वर्य संपदा बहुत मना आवरीत तयालागीं २
धरूनीया हातीं उभा काळ दंड आयुषांती धंड पाडीतसे ३
शिवदास म्हणे यालागीं सत्वर पार्वतीचा वर आठवावा ४

अभंग १३३

तोची दैवाचा पुतळा मुखीं ज्याचे नाम माळा १
तोची धन्य त्रिभुवनीं प्रेम भजनीं पूजनीं २
ज्याचे मुखीं हाची चाळा शिव शिव वेळोवेळां ३
सर्व सांडूनीया धंदा लागला जो याचे छंदा ४
शिवदास म्हणे त्याचा दास होईन दासाचा ५

अभंग १३४

मना धैर्य वळें राहे समाधान प्रेमें आठवून शिवराया १
देव जे करितो तुझ्या हितासाठीं नको होऊं कष्टी नेणोनीया २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

देई तापत्रय आणि तें संकष्ट आणावया वीट संसाराचा ३
सारूनी उपाधी लाऊनी या छंद सदा ब्रह्मानंद सुख पाही ४
शिवदास म्हणे भक्ताची माऊली निजांगीं धांवली भेटावया ५

## अभंग १३५

आदी अंती सुख दाता तूंची होसी उमाकांता १
मध्य उपाधी गोंधळ नाशिवंत हे सकळ २
जळीं तरंगाचे परी होय जाय ज्या अंतरीं ३
शिवदास म्हणे त्यास दावी ब्रह्म अविनाश ४

## अभंग १३६

मना कळ आहे थोडी संग लज्जेचा तूं सोडी १
मग होऊनीया भांड नामें गर्जवी ब्रह्मांड २
उभा ठाकोनी चौबारी हस्त उभारूनी वरी ३
दीन मुखें मारा हाका सख्या पार्वती नायका ४
शिवदास म्हणे कधीं मग वेळ लागो नेदी ५

## अभंग १३७

सर्व घेऊनीया चवी आतां आलो महादेवी १
पाहुनीया पंचमुख हारपली तहान भूक २
दृष्टी स्वरुपीं रुतली तनु भ्रांती विसरली ३
शिवदास म्हणे पुन्हा तुज वेगळी होईना ४

## अभंग १३८

होई सावधान मना सांडी विषय वासना १
स्मरूनीया उमावर चित्तीं करावा विचार २
तनु भूता पंचकाची आस्ती मांस कातडीची ३

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शिवदास म्हणे वृथा भूललासी इंद्रियनाथा ४

अभंग १३९

दास तुझे आम्ही जाहलों शंकरा न मागूं मुशारा तुम्हां कांहीं १
जैसा तैसा भोग घडो ह्या देहासी न घालूं तुम्हासी संकट तें २
परी तुम्हां असें मागणें हें एक वियोगाचें दुःख देऊं नका ३
सतत ही सेवा घ्यावी या दासाची शिवदास हेंची इच्छितसे ४

अभंग १४०

मज सम पापी कोणी नसे पाहतां या जनीं १
बोले एक करी एक ऐसा दुष्ट मी निःशंक २
सेवा न करोनी कांहीं म्हणवितो दास पाही ३
शिवदास म्हणे हरा हा अन्याय माफ करा ४

अभंग १४१

आहो तुम्ही जडजीव प्रेमें आठवावा शिव १
शिव सर्व जीवाप्रती पहा प्रचीती देहांती २
नाना मत्त नाना वर्ण पहा शोधून पुराण ३
सर्व जीवींच असती तया शिवची म्हणती ४
शिवदास म्हणे शिव स्मरता होय स्वयमेव ५

अभंग १४२

जीव शिवाची मिळणी जैसी सती पती दोन्ही १
सती पतीच्या विलासी कोण सुख हो कोणासी २
सती लागी काम सुख पति लाभे रती देख ३
जीव शिवाचे संयोगीं कोण सुख कोणा लागीं ४
शिवा भक्ति सुख मिळें जिवा ब्रह्मीचे सोहळे ५

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

जी वा सी स म र स होय असीपदीं वास ६
शिवदास म्हणे पाहे सदाशिवीं लावा सोय ७

अभंग १४३

देहीं असतांची मेला काळ काय करी त्याला १
मू ळ चा ची दिगंबर तया काय करी चोर २
काढी मुळी वासनेची तया चाड कास याची ३
शिवदास म्हणे स्वस्त नाहीं आदी मध्य अंत ४

अभंग १४४

गाऊं वाटें तुज मना तरी गावें शिव गुणा १
पाहूं वाटें जरी तुज तरी पहा शि व रा ज २
ऐकूं वाटें प्रेम प्रीती तरी ऐक शिव कीर्ति ३
जाऊं वाटें शिवदास म्हणे निजानंदीं वास ४

अभंग १४५

सर्व दे वा चीं उत्पत्ति श्रुती पुराणीं बोलती १
माता पिता जन्मभूमी वर्णितातीं गु रु स्वा मी २
परी पार्वतीच्या नाथा नसे कोठें कांहीं वार्ता ३
शि व दा स म्हणे पूर्ण ब्रह्म चि दा नं द घन ४

अभंग १४६

सर्व ध रो नी या विट स्मरीं शिव पादांगुष्ट १
बारे आलीया संसारीं आधी स्मरावा कैवारी २
नाना करितां व्यवहार शिव चरणीं ठेवीं स्मर ३
शि व दा स सांगे लये जैसा भृंगी कीटक न्याये ४

अभंग १४७

प्रभुराया तुज आलों मी शरण कृपा मज पूर्ण करी देवा १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बहु झाला शीण घेतां जन्म फेरे चुकवा येरझारे माझी आतां २
मागें बहुतांची पुरविली आंस माझी कां जगदीश करुणा न ये ३
शिवदास म्हणे ये बा विश्वेश्वरा भेट दे दातारा शीघ्र मज ४

अभंग १४८

काय माझा गुण पहासी शंकरा पतित मी खरा आहे पापी १
म्हणोनीच तुम्हा माझी ही विनंती वेगी गौ री प ती भेट देई २
भेटीची आवडी लागलीसे आतां धांव वि श्व ना था लवलाही ३
शिवदास हेंची मागे वारंवार तूं दयासागर पु र वि सी ४

अभंग १४९

सुखी असो ही मंडळी जेका ध्यातीं चंद्रमौळी १
काम क्रोधाचा वळसा नोहे माझ्या शिवदासा २
अहंकार हा दु स्त र याचा पडो द्या विसर ३
व्हावें चिरंजीव सर्व ज्याचे चित्तीं माझा शिव ४
शिवदास म्हणे त्याचें व्हावें कल्याण त्रिवाचें ५

अभंग १५०

चरणीं नृत्य करीं टाळी मुखीं शिवनामावळी १
धन्य धन्य हा सुदिन जे हे मिळालें सज्जन २
घोषें गर्जविती नभ वाटें अलभ्य हा लाभ ३
शिवदास म्हणे शिवा यासी साह्य व्हावें देवा ४

अभंग १५१

नमस्कार माझा श्रोते लहान थोरा नारी आणि नरा सर्व याती १
सांडोनी आळस लाज अभिमान क रा वें भजन प्रे मा नं दें २
शिव हर हेंची करूनी आरोळी लावावी देऊळीं दाद माझी ३

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अशक्त मी आहे दुर्बळ सर्वथा म्हणोनीया माथा ओत्या पायी ४
शिवदास म्हणे सकळ मिळोनी द्या शिव चरणीं लो टू नी या ५

अभंग १५२

शिवद्वारीं उभी संताची मंडळी ती माझी दिपवाळी आनंदाची १
काया कनक ताटी पंचप्राण ज्योती ओवाळूं पशुपती मनो-भावें २
ओवाळीन दोघा पार्वती शंकरा उचित दा ता रा हेंची द्यावें ३
लिंगेश्वर म्हणे हेंची मज द्यावें अहर्निशीं घ्यावें नाम तुझें ४

अभंग १५३

स्मरण कराहो मनीं भाव धराहो संसार सागर भक्तिबळें तराहो
अभ्रांची साऊली तैसी संपदा भुली साच नोव्हे वश करा गुरुमाऊली
विषय मदाहो काया भुलाल सदाहो टाळीवाहुन मुखीं गुरु नाम भजाहो
बसवलिंग हेंची तुम्हा हित सांगतो सर्व जगीं ब्रह्म व्हावें हेंच मागतो

# श्री शिवदासाचे शिवपाठ प्रारंभ

शिवपाठ करा शिवपाठ करा चौऱ्यांशीचा फेरा चुके येणें १
शिवावीण अन्य वेदशास्त्र पाठ व्यर्थ खटपट जाणावी ते २
शिवनाम पाठ जया सर्व काळ काळाचाही काळ होय तो ३
शिवदास म्हणे असार संसार शिवनाम सार तया माजी ४

अभंग २

शिवनाम पाठ ज्या नरा सर्वदा समाधिस्त सदा जाणावा तो १
निर्गुण समाधी साधिता कठीण अ नि वा र मन होय तेथे २
शिवाच्या स्मरणे शिवरूप मन अनायासे जाण होत असे ३
शिवदास म्हणे भृंगी कीट न्याये शिवरूप होय नि श्च ये सीं ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अभंग ३

शिवनाम कीर्ति सदा चारी वेद वर्णिती सद्गद होऊनी यां १
साही शास्त्रें ज्याच्या नामीं पारायण सदा गाती गुण तयाचेची २
अठराही पुराणें शिवलीला गाती ऐसा उमापती समर्थ जो ३
शिवदास म्हणे त्याचें नाम वाचें घेतां मग कैचें भवभय ४

अभंग ४

शिवनाम पाठ सदा प्रेमयुक्त श्रीहरी करीत स्वात्महितां १
विधि इंद्र चंद्र गंधर्वसुरवर ध्याती उमावर स्वार्थालागीं २
ऋषि मुनि योगी साधन सिध्यर्थ गाती विश्वनाथ सर्वकाळ ३
शिवदास म्हणे सर्वांसी तो ध्येय असे मृत्युंजय पहा सत्य ४

अभंग ५

उपनिषद जे कां अथर्वण शीर उभारुनी कर गर्जता हे १
महद्भूत एक रुद्र भगवान येरे सर्व जाण अंश त्याचें २
ऐसा सर्वोत्तम असे माझा शिव एकवेळां नांव घेतां तारी ३
शिवदास म्हणे मग जे सतत उच्चारिती त्यातें उणें काय ४

अभंग ६

असकृदुच्चारें श्वेतादी करूनी कैलास भुवनीं पावले कीं १
पुराण प्रसिद्ध असती या कथा गेले मोक्षपंथा असंख्यात २
दोषीयांचे दोष हरुनिया मुक्ति द्यावयाची शक्ति नामीं बहू ३
शिवदास म्हणे ऐसें शिवनाम उच्चारितां जन्म मृत्यू खंडे ४

अभंग ७

नामा वांचूनिया आणिक साधन करितां तें मन नावरेची १
योग याग तप प्राणायामादिक कली माजीं देख न साधती २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शिवनाम पाठें अनायासें मन होतसे उन्मन निश्चयेसी ३
शिवदास म्हणे शिवनाम स्मरा साधन पसारा टाकूनिया ४

अभंग ८

साधनाचें सार योग्याचें जीवन योगासी कारण मुख्य नाम १
प्राणायाम बीज तपाचें भूषण मुमुक्षुसी जाण मोक्षपद २
ऐसें शिवनाम सर्वांशीं कारण म्हणोनी स्मरण करा सदा ३
शिवदास म्हणे शिवनामा पुढें साधन बापुडें अन्य किती ४

अभंग ९

तीर्थ व्रत दान केलें जें पुष्कळ तरी पावे फळ नोहे मोक्ष १
तैसें नोहे नाम माझ्या शंकराचें उच्चारितां वाचें होय मोक्ष २
सर्वकाळ प्रेमें वाचें उच्चारितां व्हावया मुक्तता नवल काय ३
शिवदास म्हणे तयाचें दर्शन घेतां जीव जाण उद्धरती ४

अभंग १०

सदा प्रेमयुक्त जपा शिवनाम सकळही काम टाकोनीया १
तयाचें संचित जातसे जळोनी नासे क्रीयमाण नामबळें २
प्रारब्ध तों त्याचें सरतसे भोगें मग देह-त्यागें शिवची तो ३
शिवदास म्हणे महात्म्य नामाचें कोठवरी वाचें वर्णावें तें ४

अभंग ११

शिवभक्तिवीण केलें जें सत्कर्म तरी तें दुष्कर्म होय पहा १
दक्षप्रजापति यज्ञ करूं गेला शिरच्छेद झाला तयाचा कीं २
चंडादि सद्भक्त वधूनी पितर पावले सत्वर मोक्षपदा ३
शिवदास म्हणे ऐसी शिवभक्ति कर्माकर्मीं गुंती नसे जेथें ४

अभंग १२

अलभ्य हा लाभ नरदेह ऐसा लाधला तो कैसा गमाविता १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मग कोण्या देहीं कराल सार्थक पहा हो विवेक क रू नि या २
यालागीं मी तुम्हां सांगतों ही सोय गेली घडी न ये प र तो नी ३
शिवदास म्हणे सदा शिवशिव स्मरा मग भव कैचा तुम्हां ४

अभंग १३

भव रोगावरी दिव्य रसायन औषध हें जाण शि व ना म १
तयावीण अन्य करितां उपाय जाणा ते अपाय होती सर्व २
म्हणोनीच तुम्हां सांगतों हें हित स्मरा हो सतत शि व ना म ३
शिवदास म्हणे मग भवभय स्वप्नींही न होय बा ध क तें ४

अभंग १४

कांता पुत्र वित्त देहादि प्रपंच दिसतसे साच परी मिथ्या १
म्हणूनी हो त्याची टाकूनिया आस स्मरा शं क रा स सुखालागीं २
आपुल्या भक्तातें असे सुखकर म्हणूनि शंकर नाम त्याचें ३
शिवदास म्हणे शंकरा वांचुनी कोण त्रिभुवनीं सुख दाता ४

अभंग १५

आपुलें कल्याण व्हावें ज्यांचें चित्तीं त्यानीं शिवाप्रति शरण जावें १
कल्याण-स्वरूपीं कल्याणीरमण नामही कल्याणप्रद त्याचें २
शिवाचें तें नाम करिता स्मरण शीघ्रची कल्याण होय त्याचें ३
शिवदास म्हणे कल्याण दायक असे माझा एक शिवची तो ४

अभंग १६

आसनीं शयनीं भोजनीं गमनीं प्रेमें शूळ पाणी स्मरावा तो १
ऐसा निजध्यास लागतां जागृतीं स्वप्नींही स्मृती सहज राहे २
सुषुप्तींत जीव होय शिवीं लीन नसूनी स्मरण स्मृती असे ३
शिवदास म्हणे ह्याची शिवयोग असे शिरोभाग सा ध ना चा ४

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri



### अभंग १७

सुवर्णांत नग नगीं तें सुवर्ण तैसेंची अभिन्न जीव शिव १
ऐसें जन्मवरी करितां मनन नावरेंचि मन साधकासी २
अंतरीं तो ऐसा असोनी विचार स्मरे निरंतर शिवासी जो ३
शिवदास म्हणे तयाचें तें मन होतसे उन्मन शिवरूपें ४

### अभंग १८

अन्न आच्छादन सुख दुःखादिक प्रारब्धेंची देख लभ्य जीवा १
म्हणूनियां त्याचें टाकूनी चिंतन करावें स्मरण शंकराचें २
नरदेहामाजी अलभ्य हा लाभ पार्वति–वल्लभ गावा गीतीं ३
शिवदास म्हणे शिव स्मृतिवीण पळभरी जाण राहूं नये ४

### अभंग १९

चौऱ्याऐंशी लक्ष जन्म फिरक्यांत अवचित प्राप्त नरदेह १
तयाचें आयुष्य जाय ऐसें तैसें पुन्हा तेंची असे शिरावरी २
यालागीं सावध होऊनी सत्वर स्मरा निरंतर शिवनाम ३
शिवदास म्हणे मग ती चौऱ्याऐंशी चुके निश्चयेंशी सत्य जाण ४

### अभंग २०

अनंत जन्मींचें ज्या गाठीं सुकृत तोची शिवभक्त होय पहा १
शिवनाम जया आवडे अत्यंत तोची जीवन्मुक्त जाणावा हो २
ज्ञानेंविण मोक्ष नव्हेची निश्चय ऐसा हा संशय धरूं नये ३
शिवदास म्हणे ज्ञानासी कारण असे मुख्य जाण शिवची तो ४

### अभंग २१

निर्गुणीं निर्गुण सगुणीं सगुण त्रिगुणीं त्रिगुण शिवची तो १
ऐसें साधुमुखें जाणुनिया तत्व स्मरतां जीवित्व नुरे कांहीं २

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

हा जरी आपणा न कळेची बोध तरी नाम शुद्ध जपा वे हो ३
शिवदास म्हणे तेणें शुद्ध सत्व होय मग तत्व कळें स्पष्ट ४

अभंग २२

अव्यक्त चित्तासी योजु जातां बळें कष्टाप्रती गेले उ पा स क १
बाहुबळें जैसें समुद्रीं तरण हें जैसें कठीण तैसें ते ही २
शिवनाम बळे विश्व शिवमय होय निःसंशय साधकासी ३
शिवदास म्हणे साधन हें श्रेष्ठ शिवनाम स्पष्ट जपा तुम्हीं ४

अभंग २३

सगुण प्रसाद श्रुती म्हणे मोक्ष साधुचाही पक्ष हाची असे १
दयाळुत्व आदी गुणया सगुण हें नसे निर्गुण अगुण तें २
तयाचा प्रसाद तयाचेंची नाम स्मरावें तें प्रेम भरे सदा ३
शिवदास म्हणे मग तो प्रसन्न होऊनियां जाण करी मुक्त ४

अभंग २४

नाम स्मरे त्याच्या रूप लागे पाठीं न इच्छितां भेटी देऊं धांवें १
नामावीण अन्य करितां साधन नेदी भेटी जाण शीघ्र त्यासी २
नाम स्मरें तोची आवडे अत्यंत म्हणूनि धांवत भेटावया ३
शिवदास म्हणे शिवनाम ऐसें साधनची नसे दुजें अन्य ४

अभंग २५

रूप तेंची नाम नाम तेंची रूप नाम ऐका माप विशेष कीं १
ज्ञान होवोनियां स्वरूपाचें ध्यान करी तेव्हां जाण मुक्त होय २
तैसें नोहे नाम स्मरे त्यासी ज्ञान देऊन सत्वरें मुक्त करी ३
शिवदास म्हणे विश्व रूपाहून आधिक म्हणून स्मरा नाम ४

अभंग २६

अन्य साधनांत साध्य असे भिन्न तैसे नसे जाण नामामाजीं १

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

यांत साध्य आणि साधन तें एक पहा हो विवेक क रू नि या २
नाम तेंची रूप रूप तेंची नाम ऐसें तें निगम ग र्ज ता ती ३
शिवदास म्हणे नामा ऐसें आन सा ध न ची जाण नसे दुजे ४

अभंग २७

सर्व साधनांत नाम असे सार किती सांगावें हो वा रं वा र १
तीर्थव्रत नेम दान यज्ञादिक न कळेची देख नामावीण २
भुक्ति मुक्ति ज्ञान वैराग्यादि सर्व न लाभे वै भ व ना मा वि ण ३
शिवदास म्हणे नामाचें महत्व स्मरे त्याशी तत्व कळे त्याचें ४

अभंग २८

शिवपाठ पाठ नित्य नेम ज्यासी यम वंदी त्यासी दूरूनिया १
ब्रम्हा विष्णु आणि रुद्रादि सुरवर करिती सत्कार बहु त्याचा २
चरणींचें त्याचा तीर्थ मागावया येती धांवोनिया सर्व तीर्थें ३
फलश्रुती सुद्धां असे अठ्ठावीस म्हणे शि व दा स अभंग हे ४

अभंग २९

न कळोनी अर्थ पाठ करी भावें तोही ज्ञान पावें शि व कृ पें १
भावही न कळे ऐसे जे कां मूर्ख स्त्रिया बाळादिक हो का कोणी २
त्यांहीं नित्य नेमें करितां पठण क्रमें भावें ज्ञान लाधतें कीं ३
शिवदास म्हणे पूर्वसंख्येहून अधिक हा जाण एक असे ४

इति शिवपाठासह सर्वश्री मन्मथस्वामी, शिवलिंगस्वामी लिंगेश्वर, बसवलिंग, महादेव, लक्ष्मण, शिवदास यांचे अभंगाचा गाथा










CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri



# नमःशिवाय

नमःशिवाय ॐ नमःशिवाय मंत्र मनीं ठसला
चहूंवेदांच्या शब्द – सागरा मंथनीं सांपडला ।।दयाळा।। १
बीज मंत्र हा नमः शिवाय आपलासा केला
सदा जपे जो प्रेमभक्तीनें भवसागर तरला ।।दयाळा।। २
आधी व्याधीही पळती भिऊनी म्हणती काळ आला
पाहुनी ऐशा शिवभक्ताला यमही थरथरला ।।दयाळा।। ३
काय वर्णूं मी महिमा त्याची शिव शिव जो वदला
शब्दरुपानें जणूं शिवशंकर हृदयामध्यें शिरला ।।दयाळा।।४
हृदया काशी शिवशक्तीमध्यें प्रकाश लखलखला
पाही जीव त्या प्रकाशयोगें सर्वं खलु वदला ।।दयाळा।। ५
नमःशिवाय सतताभ्यासें सर्व उपाधीला
त्यजुनी पावला जीव अनादी सोहं वृत्तीला ।।दयाळा।। ६
सोहं जपतां नाम शिवाचें आत्मत्वीं रमला
म्हणुनी जपा तुम्हीं नमःशिवाय सांगे जगताला ।।दयाळा।। ७



# नमःशिवाय

## द्वादश–ज्योतिर्लिंग–आरती

कर्पुर आरती अर्पण करितों द्वादशज्योतिर्लिंगाला
सर्पविभूषित दर्पविनाशक जगद्वंद्य शिवलिंगाला ।।१।।
सृष्टि-कष्ट वि-भ्रष्टित श्रेष्ठ श्रीयुत ज्योतिर्लिंगाला
निष्ठायुत भज सौराष्ट्राधिप सोमनाथ शिवलिंगाला ।।२।।

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri



सोन्नलाधिपती सिद्धरामनित पूजित ज्योतिर्लिंगाला
पन्नग-भूषण शैलवासी श्री मल्लिनाथ शिवलिंगाला ॥ ३ ॥
सुजनपालकर कुजनशूलकर उज्वल ज्योतिर्लिंगाला
राजसुपूजित उज्जनिश श्री महांकाल शिवलिंगाला ॥ ४ ॥
भक्तांकित संकेत मुक्तजय कलिमल हारकलिंगाला
वेंकट पूजित ॐकारेश्वर ममलेश्वर शिवलिंगाला ॥ ५ ॥
सर्वसुरार्चित गर्वविनाशित पर्वकोश सुलिंगाला
सर्वेश्वर सकलांतक परळी वैद्यनाथ शिवलिंगाला ॥ ६ ॥
सौख्यहास्यकर दुःखनाशकर सुकांत ज्योतिर्लिंगाला
भक्तिमुक्तीकर डाकिन्यान्वित भीमाशंकरलिंगाला ॥ ७ ॥
सत्यप्रियकर मिथ्यप्रलयकर उत्तम ज्योतिर्लिंगाला
नित्यसुरासुर पूजीत सेतू रामेश्वर शिवलिंगाला ॥ ८ ॥
योगध्यानधर भोगभंगकर जागृत ज्योतिर्लिंगाला
जगद्भाग्य भास्कर जय औंढे नागनाथ शिवलिंगाला ॥ ९ ॥
विश्वपालका विश्वशूलका सुशील ज्योतिर्लिंगाला
विश्वमान्य विश्वार्चित काशी विश्वनाथ शिवलिंगाला ॥१०॥
संगलयकर भंगभयकर शंभूरुप श्रीलिंगाला
अंबाप्रियकर मंगलांगधर नाशिक त्र्यंबक लिंगाला ॥११॥
रुद्ररूपधर भद्ररूपकर उदार ज्योतिर्लिंगाला
सदाशुभंकर मदनांतक केदार सुभूषण लिंगाला ॥१२॥
पावनगात्रा स्तवनसुपात्रा निवांत ज्योतिर्लिंगाला
देवसुपूजित भावसमर्पित घृष्णेश्वर शिवलिंगाला ॥१३॥
निशिदिनीं गातों प्रशांतभावें जगद्वंद्य शिवलिंगाला
बसव विनावितो प्रसन्न होण्या द्वादश-ज्योतिर्लिंगाला ॥१४॥

SRI JAGADGURU VISHWARADHYA
JNANA SIMHASAN JNANAMANDIR
LIBRARY
Jangamawadi Math, Varanasi
Acc. No. 3522



नमःशिवाय

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri



# नमः शिवाय

# शान्ती आणि समाधान

## हेंच जीवन मुक्तीचें शुभ लक्षण

❋ ॐ नमः शिवाय ❋

ऐसा गुरुराया-वरुनी ओवाळीन काया
ओवाळीन काया वरुनी ओवाळीनकाया १

त्रिविध ताप संताप निमाला
ब्रम्ह सदोदित केलें जिवाला २

आपुलें निज रुप मज दाखविलें
महा वाक्य अमृत मज पाजवीले ३

मी तूं भास उरला नाहीं जेथें
बसवलिंग स्थिर झाले तेथें ४

❋ ॐ नमः शिवाय ❋

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

